"श्री देवकी-कृष्ण प्रसन्न"

गद्यपद्यात्मक पौराणीक नाटक.

# "बहकलेली-ब्रह्मचारी"

अंक १ ते ३

लेखकः—माधवराव आप्पाजी कामत.

प्रतिज्ञा कंकण, तोफेच्या-तोंडी, वर-परिक्षा आणि

सैतानी-स्वार्थ या नाटकांचा कर्ता.

१२ मार्च १९३८.

किंमत १० आणे.

लेखक—



**माधवराव आप्पाजी कामत.**

# — हितगूज. —

——:०:——

" नारदाची–नारदी " या पौराणीक कथेच्या आधारावर मी "बहक-लेला–ब्रह्मचारी " हें नाटक लिहिलं आहे. आधींच " पुराणांतली वांगीं पुराणात " असं म्हणून पुराणाकडे वक्रदृष्टीनं पाहणाऱ्या आमच्या बहुजन समाजाला अशक्य वाटणाऱ्या गोष्टीना फाटा देऊन " नारदाच्या संसाराचा परिवार अपरिमित वाढल्यामुळं, तो संसाराला कंटाळून पूर्वपदावर कसा येतो, तसंच पेंद्या संसाराला कंटाळून परब्रम्हस्वरूपाच्या मागें लागला असतां तो फिरून कसा संसारी बनतो " हें कथासूत्र मी नाटकांत गुंतविलं आहे. त्यामुळं कदाचित मी पुराणमतवादी लोकांच्या रोषाला पात्र होण्याचा संभव आहे.

हें नाटक " देशबंधु संगीत मंडळीनी " उरण येथें ता. २८–१०–१९३५ रोजीं रंगभूमीवर आणलं त्यानंतर आतापर्यंत बाहेरगांवीं या नाटकाचे बरेच प्रयोग झालेले आहेत. त्याचें श्रेय देशबंधु संगीत मंडळीचे मालक श्री. गणपतराव काळसेकर, त्यांचे बंधु मॅनेजर बापुसाहेब काळसेकर, व माझे मित्र श्री. हरीभाऊ जोशी ( माधव एजन्सी ), आणि श्री. दादा घोगळे यांनाच दिलं पाहिजे. माझे मित्र श्री. दत्तात्रय पांडुरंग कोरगावकर ( ग्रामोफोन सृष्टीतील सुप्रसिद्ध संगीत दिग्दर्शक ) यानी माझ्या या खास नाटकाकरितां प्रसंगास अनुसरून अशा नवीन चाली तयार करून दिल्या. यातील बहुतेक चाली रेडियो ग्रामोफोनद्वारें प्रसिद्ध झालेल्या आहेत. श्री. द. पा. कोरगांवकर यांच्यासारखें संगीत कलेंत क्रांती घडवून आणणार व आज महाराष्ट्रांत नांवारूपाला आलेले संगीत दिग्दर्शक, यांनी आपल्या स्नेहत्वाला जागून अमूल्य वेळ खर्च करून कांहीं मोबदला न घेतां या नाटकात संगीत योजना केल्याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहे. या नाटकाचा प्रथम प्रयोग मुंबईत करण्याचं श्रेय धुरंधर संगीत विद्यालयाचे चालक श्री. पाटील बंधुद्वयानीं घेतलं आहे. त्याचें कौतुक करण्यांचें काम रसिक वृंदावर सोंपवितों. हें नाटक लिहितांना योग्य सूचना केल्याबद्दल व प्रकाशनाचें कार्य स्वताच्या शिरावर घेतल्याबद्दल माझे मित्र श्री. अनंत दत्तात्रय लोटलीकर एम्. ए. एल्‌एल्. बी. ॲडव्होकेट हायकोर्ट मुंबई यांचे, या नाटकातील फोटो अल्प मोलांत

आस्थेनं व आपलेपणानं श्रीयुत विष्णुपंत यांनी स्वताच्या "वीर आर्ट स्टुडियो-मध्यें काढून दिल्याबद्दल त्यांचे व तसेंच अल्पावधीत व सुबकरितीनें हें नाटक छापून दिल्याबद्दल "बॉंबे मेट्ल प्रेसचे" मालक, श्रीयुत पी. जे. देसाई यांचे आभार मानणें अस्थानी होणार नाही. महाराष्ट्राचे प्रतिभा संपन्न नाटककार श्रीयुत मामा वरेरकर यांनी माझ्या शब्दाला मान देऊन प्रस्तावना लिहिण्याचं कार्य अंगावर घेतल्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच. शेवटीं माझे वेडवाकडे बोल रसिकवृंद मान्य करून घेतील अशी आशा बाळगून हें हितगूज पुरें करतों.

गिरगाव टेरेस,<br>
३ रा मजला,<br>
गिरगाव मुंबई नं. ४.<br>
ता. १०-३-१९३८

सर्वांचा कृपाकांक्षी,

**मा. आ. कामत.**

# प्रस्ताव

पौराणीक कथानक असलें म्हणजे त्याचें मूळ शोधण्याची वाचकांची साहजीक प्रवृत्ती होते. त्यांतूनही नाटकासाठीं अशा पौराणीक कथानकांची ज्यावेळीं योजना केली जाते त्यावेळीं चिकित्सक वाचक आणि प्रेक्षक कथानकाच्या आधारभूत ग्रंथाची चौकशी करूं लागतो.

वस्तुस्थिती अशी आहे कीं नाटकाच्या परिणामकारकतेमुळें, किती तरी पौराणीक कथानकें आज बदलून गेलेलीं आहेत. कालीदासानें शाकुंतलात पौराणीक कथानकाची जी अदलाबदल केली आहे, दुर्वासाच्या शापाचा जो काल्पनीक प्रसंग घातला आहे आणि कण्वाच्या उपदेशाचें जें चऱ्हाट वळलें आहे त्याची छाप सर्व साधारण जनसमाजावर इतकी बसली आहे की त्यामुळें मूळ कथानकाची कुणी चवकशीही करीत नाही.

किर्लोस्करांच्या सौभद्रात देखील असाच फरक केला गेला आहे. वास्तवीक अर्जुनाचा त्रिदंडी सन्यास एक दोन दिवसापुरता असता, चातुर्मास अर्जुन बळिरामाच्या घरीं राहिल्याचा जो कथाभाग किर्लोस्करानी बनवला, तो पुराणाला आधारून कीर्तन करणाऱ्या हरदासाना देखील आज मान्य होऊन बसला आहे.

उत्तर कांडातील शंबूक, अयोध्या कांडातील रामराज्य वियोगात खेचून आणण्यात किर्लोस्करानीं जें चातुर्य दाखविलें त्यामुळें, पौराणीक कथानकातील ती उलटापालट आज अधिकृत स्वरूपाची होऊन बसली आहे.

भासाच्या रामायण आणि महाभारत कालीन नाटकात असेच फरक केले गेले आहेत. मूळ पौराणीक भूमिकाचें स्वभाव दर्शन जोंपर्यंत विकृत होत नाही तोंपर्यंत नाट्यवस्तूच्या परिपोषासाठीं पौराणीक कथानकात आकर्षकता आणण्यासाठी फेरफार करण्याची मुभा घेणें अनादिकालापासून सुरू आहे.

प्रस्तुत नाटकाच्या कर्त्यानें या कथानकात पूर्वकालीन लेखकाच्या परंपरेला अनुसरून जो फेरफार केला आहे तो, म्हणूनच दोषार्ह मानण्याचें कारण नाहीं. कृष्ण चरित्रावरील अधिकृत असलेल्या कोणत्याही पुराणात, म्हणजे महाभारत व हरिवंशांत प्रस्तुत कथा उपलब्ध नाही. कोणत्या तरी उपपुराणावरून ही कथा प्रचलीत झालेली असावी असें वाटतें. या कथेवर आधारलेलें **टिपनीस** यांचें "**कपिलाषष्ठी**" नाटक १९१७ साली रंगभूमीवर आलें होतें. त्यात नारदाला स्त्रीत्वच मिळाल्याचें दाखविलें होतें असें नाहीं, तर त्यात जगाच्या

# अंक पहिला.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**—रस्ता. **पात्रें**—( नारद व पेंद्या. )

**नारदः**—

( पहाडी—केरवा. )

**फुले खुले लतिका मनोहर, वृक्ष समागमिं, भृंग—कमलिनी,**
**इन्दु—सुधा नभिं रंगलीं कां ? ॥ धृ० ॥ नाचे डोले राघु—मैना ॥**
**व्रजनिवासी गाति गाना ॥ सुखविलासीं गोपगोपिका ॥**
**दृश्य सुखावित मानसा कां ! ॥ १ ॥**

संसार थाटण्याची आज्ञा एकदाची शेषशाई नारायणाकडून मिळविली आणि द्वारकेची वाट धरली. पण घर ना दार आणि हातीं चिपळ्या—वीणेचा आधार अशा त्रिलोकीं संचारणाऱ्या सन्याशाला मुलगी देणार कोण ? संसाराच्या सुरवातीलाच जर विवंचना पाठीशीं लागली, तर संसाराला सुरवात झाल्यावर, पाठीची विवंचना नकोसा जीव केल्याशिवाय राहाणार नाहीं. खरा संसारी भेटल्याखेरीज हें संसार रहस्याचं कोडं मला उलगडता येणार नाहीं. श्रीमंतांचा संसार श्रीपासून होत असल्यामुळं, दुःखाच्या दर्या ऐवजी, सुखाचं साम्राज्यच, त्यात त्यांना दिसणार. तेंच गरिबाच्या चंद्रमौळी झोंपडींत, संसाराचं खरं रहस्य दिसेल. कुणा तरी गरिबाला गुरु केल्याशिवाय, संसाराची गुरुकिल्ली सापडायची नाहीं. कुणाला बरं गुरु करावा ! (विचार करून) पेंद्या ! हो, त्यालाच गुरु करावा. सुखदुःखाच्या डोंगराळ प्रदेशातून प्रवास करणारा, त्याच्यासारखा दुसरा संसारी सांपडायचा नाहीं. ( इतक्यात दुसऱ्या बाजूनें पेंद्या येतो, दोघांची दृष्टादृष्ट होतांच " गुरु महाराज " म्हणून एकमेकांना साष्टांग नमस्कार घालतात. )

**पेंद्याः**—नारदमुनी, मला नमस्कार करण्याची आपली विचित्र कृती पाहून मी तर भांबावून गेलों आहे.

**नारद:**—पेंद्या, केव्हां केव्हां विचित्र वाटणारी कृतीच उचित असते.

**पेंद्या:**—महाराज, नमस्कार घेण्याचा आपला अधिकार आहे. करण्याचा नाहीं. तिन्हीं लोकीं वंद्य असणाऱ्या नारदांनीं, माझ्या सारख्या गरीब गुराख्याला साष्टांग नमस्कार घालणं योग्य होईल का ?

**नारद:**—पेंद्या, योग्यायोग्यतेचा प्रश्न गरिबी श्रीमंतीवर अवलंबून नसतो, सद्गुण, सदाचार आणि सौजन्य, यांचा त्रिलोकीं गौरवच होतो.

**पेंद्या:**—पण या पेंद्याला सद्गुणी म्हणणारा एकही मनुष्य, या उभ्या द्वारकेंत सांपडणार नाहीं.

**नारद:**—स्वतःचे सद्गुण स्वतःला दिसत नसतात. माझ्या कार्याला उपयोगी पडणारे सद्गुण तुझ्या ठिकाणीं असलेले पाहूनच मी तुला नमस्कार केला. तूं माझा गुरु आणि मी तुझा शिष्य.

**पेंद्या:**—काय मी आपला गुरु आणि कुठल्या कामीं ? आपण माझी गरिबाची थट्टा करता की काय !

**नारद:**—नाहीं. पेंद्या, खरोखरच मी तुला गुरु केला आहे. पण तूं मला गुरु महाराज म्हणून का नमस्कार केलास ?

**पेंद्या:**—मीहि आपल्याला माझा गुरु केला आहे.

**नारद:**—तो कशासाठीं ?

**पेंद्या:**—परब्रम्ह स्वरूपाचा मंत्रोपदेश घेण्यासाठीं.

**नारद:**—काय परब्रम्हस्वरूप ?

**पेंद्या:**—होय. नारदमुनी, काय अशक्य आहे आपल्यासारख्या परब्रम्ह परमकोटीला पोंचलेल्यांना ? मनात आणाल, तर नराचा नारायण करूं शकाल.

**नारद:**—पेंद्या, बालबुद्धीला वाटेल त्या मार्गीला वेलीप्रमाणं वळवितां येतं, पण संसार-सुखाला लालचावलेल्या मनाला, संन्याशाची दिक्षा देणं फार अशक्य असतं. तेव्हां तूं त्रिदंडी संन्यास घे, म्हणजे वाटेल त्या वेळीं फिरून तुला संसारी होतां येईल.

**पेंद्या**:—महाराज, मी संसाराला कंटाळलों आहे. कुळाचं नांव नामशेष होऊं नये म्हणून संसारांत पडलों, पण आतां संसाराचं नांव घेतलं, तर नांवानिशीं संसारातून निसटून जावं असं वाटूं लागतं. दोन हाताचे चार हात करून चतुर्भुज झालों, पण घरच्या अष्टभूजा देवीच्या गर्जनेपुढं सहस्रार्जुनाची देखील दाणादाण झाल्याशिवाय राहणार नाहीं. तेव्हां रोजची तोडातोंडी होऊन, संन्याशाचा संसार करण्यापेक्षां संसाराचा संन्यास घेऊन परब्रम्हस्वरूप गांठण्याचा मी निश्चय केला आहे. त्रिदंडी संन्यास घेणं म्हणजे स्मशान वैराग्यासारखं होईल. म्हणून याच पावलीं संन्यास घेण्याची माझी तयारी आहे.

**नारद**:—ठीक आहे. काहीं दिवस संसारात राहूनच मन समाधिस्थ करण्याचा प्रयत्न कर. तेवढी मनाची तयारी झाल्यावर, निर्जन अरण्यात देवांच्या समाधीशी एकजीव होणं तुला कठीण वाटणार नाही. मग गुरुची गरज सुद्धां तुला भासणार नाही. पेंद्या, मी तुला संन्याशाची दिक्षा दिली, पण तूं मला संसाराची दिक्षा कधी देणार ?

**पेंद्या**:—म्हणजे ?

**नारद**:—मला संसारी व्हायचं आहे. लग्न करून संसार थाटायचा आहे.

**पेंद्या**:—काय संसारी व्हायचं आहे ? नका महाराज, संसारी होऊं नका. संसारी होणं म्हणजेच सुखाचा जीव दुःखांत घालण्यासारखा आहे.

**नारद**:—पेंद्या, दुःखाशिवाय सुखाला गोडी नाहीं.

**पेंद्या**:—कुणी सांगितलं तुम्हांला संसारांत सुख आहे म्हणून !

**नारद**:—संसारात सुख नसतं तर सृष्टीचा परिवार वाढला नसता. मी न् एकमेकांना दिसलों नसतों.

**पेंद्या**:—नारदमुनी, मलाही एकेकाळीं संसार सुखाचा वाटत होता. संसारी झाल्यावर जिवाचं सार्थक होईल अशीं सुखस्वप्नं पडत होतीं. पण थोड्याच काळात संसाराचा परिवार वाढून, पोरांचं लटांबर पाठीमागं लागलं, बायकोपोरानीं जीव नकोसा केला म्हणूनच मला संसाराचा वीट आला. मला तुम्हीं गुरु मानतां, तर गुरुची आज्ञा म्हणून तरी संसारी होऊं नका.

**नारदः**—पेंद्या, कुणालाही एकाच स्थितींत कंटाळा येणं साहजीक आहे. स्थित्यंतर झाल्याखेरीज मन्वंतर दिसून येत नाहीं. तुझीच गोष्ट घेना ! तुझं अर्ध आयुष्य संसारांत गेल्यामुळं, तुला त्या स्थितीचा वीट आला आहे, म्हणूनच तू स्थित्यंतर करायला तयार झाला आहेस. त्याचप्रमाणं मलाही या चिपळ्या वीणेचा वीट आल्यामुळं, संसारी बनून, मन्वंतर करण्याचा माझा विचार ठरला. एकूण काय, आपण दोघेंही एकाच स्थितींत आहोंत. तेव्हां स्थित्यंतर झाल्याखेरीज, दोघांच्याही मनाला समाधान मिळणार नाहीं.

**पेंद्याः**—आपण संसारी व्हायला तयार झालांत खरे, पण तुम्हांला मुलगी देणार कोण ? आधींच आपलं नांव "कळीचा—नारद" म्हणून द्वारकेंत गाजलं आहे. तेव्हां कुठली गौळण, तुमच्या या तंतुवाद्यावर मोहून जाऊन तुमच्या बरोबर संसार करायला तयार होईल ?

**नारदः**—तेवढीच अडचण माझ्या संसाराच्या आड येणार आहे. नाहीं तर केव्हांच संसारी झालों असतों.

**पेंद्याः**—पण तुम्हांला नातं ना गोतं, घर ना दार आणि देवळी विराड अशा नादार नवरदेवाशीं, आपल्या मुलीची जन्माची गांठ घालून, जगाच्या पाटीवर तुमचा संसार थाटायला, कोणत्या मुलीचा बाप तयार होईल ?

**नारदः**—पेंद्या, या संसारांतल्या खांचाखोंचा मला माहीत नाहींत. कांहीं कर आणि या सन्याशाचा संसार थाटण्याचं पुण्य पदरीं पाडून घे. कुणाचं चांगलं होत असेल, त्या वेळीं खोटं बोलणं देखील पुण्यच ठरतं. प्रयत्न करणं तुझ्या हातीं आहे. मग मी आणि माझं नशीब.

**पेंद्याः**—एकूण तुमचा नशीबावर विश्वास आहे तर ?

**नारदः**—पेंद्या, माणसाचा हात धरतां येईल, पण नशीबांतलं चुकवितां येत नाहीं, तरी नशीबावर विश्वास ठेऊन, प्रयत्न न करणं चुकिचं ठरतं. प्रयत्न करून नशिबाची परिक्षा पहावी. मग यशापयशाचं पारडं परमेश्वराच्या हातीं.

**पेंद्याः**—आपण मला गुरु केलंत, तेव्हां शिष्याला हातभार लावण्यांत, माझ्याकडून तिळमात्र अनुमान होणार नाहीं. पण माझं काम—

**नारद**:—तें माझ्याकडे लागलं; आपण एकमेकानीं एकमेकांना गुरु केल्या मुळं, मीही तुला मंत्रोपदेश देण्यांत विलंब लावणार नाही. (जातात.)

## प्रवेश २ रा.

**स्थळ**:—सत्यभामेचा महाल. **पात्रें**–(सत्यभामा, कृष्ण आणि नारद.)

**कृष्ण**:—भामा, पुरे झाला नाहीं कां अनुराग ? आणखी किती वेळ असा हा अबोला चालायचा ? एवढ्या आर्जवानी दगडाला देखील पाझर फुटला असता. पण तुला काही अजून माझी कीव येत नाही. पतीला पत्नीची पायधरणी करण्याचा प्रसंग यावा, म्हणजे काळ उलटला असच म्हटलं पाहिजे. भामा, तुटेपर्यंत ताणणं बरं नव्हे.

**सत्यभामा**:—आणि पत्नीला मात्र महिनेच्या महिने विरहांत अगत ठेवणं पतीला शोभतं वाटतं ?

**कृष्ण**:—त्यात माझा अपराध आहे का ?

**सत्य**:—नाही तर माझा वाटतं ?

**कृष्ण**:—तुझा नाही आणि माझाही नाही. भामा, माझ्या वाट्याला एकच पत्नी असती, तर तिला एक घटका देखील तिष्टत ठेवली नसती. उलट तिलाच माझ्या सहवासाचा वीट आला असता.

**सत्य**:—कुणी सांगितलं होतं एवढ्या नायिकेचा परिवार पदरीं बाळगायला ! माणसानं पचेल तें खावं आणि रुचेल तें बोलावं. स्त्रीला कागदी सवत देखील सहन होत नाहीं. पण तुम्ही मात्र जिवंत सवती माझ्या उरावर नाचवीत आहात आणि त्यांतच तुम्हाला पुरुषार्थ वाटतो. इतकं करून सवरून “ त्यात माझा अपराध आहे कां ? ” असं बोलून नामानिराळे राहण्याची आपली तयारी.

**कृष्ण**:—म्हणून मला तिष्टत उभं राहण्याची शिक्षा देतेस वाटतं ? आलों नाहीं तरी रागावतेस आणि आलों तरी रागावतेस. त्यामुळं आता कसं वागावं, हे माझं मलाच कळत नाही.

**सत्य**:—ही सगळीं सोंगं ढोंगं मला समजतात बरं ? माझी काही आपल्याशीं आजची नवीन ओळख नाहीं.

( बागेश्री-त्रिवट )

**मोहुनि मधु बोलि मधुर, प्रणय-भाव, हृदय-ठाव कधिं न देति रामा ॥ धृ० ॥ मन-रमणा रमवाया ॥ शिणविति नित निज काया ॥ भक्ति प्रेम, भाव विमल, राहि अचल, नारि अखिल ॥ कधिं ॥ १ ॥**

**कृष्णः**—म्हणूनच वाटतं अनोळखी माणसासारखी माझ्याकडं पाठ करून उभी राहिली आहेस ?

**सत्यः**—देखल्या देवा दंडवत. दारावर धरणंच देऊन बसल्यामुळं, इकडं येणं झालं; नाही तर रुक्मिणीच्या महालाकडं आपले पाय धावत होते हें मी विसरलें नाही.

**कृष्णः**—भामा, येऊन जाऊन तुझा कटाक्ष काय तो रुक्मिणीवर. तिच्याबद्दल तुझ्या मनात एवढा मत्सर कां ? ती नाही कुठं करीत तुझ्याबद्दल मत्सर ? तिच्या तोंडून चुकूनदेखील एक दिवस तुझ्याबद्दल वाईट शब्द निघत नाही, उलट ती तुझी स्तुतीच करते.

**सत्यः**—कुणाला ठाऊक स्तुती करते की निंदा करते ती ? मी थोडीच तिची पाठराखणी करतें तिची बोलणी ऐकायला ? तुम्ही तिची पडती बाजू सांभाळणारच. आवडती आहे ना ती ?

**कृष्णः**—आणि तूं नावडती वाटतं ? हा भेदभाव मी तरी बाळगीत नाहीं. पण तें तुला कसं कळणार ? हा सवतीमत्सरच संसार-सुखाचा नाश करायला कारणीभूत होतो. मी तर विटलों या संसाराला.

( तिलंग-त्रिवट )

**सौख्य भास गमला ॥ ज्या गृहिं वास सदां सहचारिणि नामित्ते, नाचविती पति, अंगुलि आर्जवि ॥ धृ० ॥ सवति सवति वरिति मत्सराला ॥ पूर्व जन्मिचा डाव साधिला ॥ स्थल ना लाभे आरामाला ॥ नच करूणा, पति देह वांकवी ॥ १ ॥**

**नारदः**—( प्रवेश करून ) का कृष्णा, विटलास का बुवा संसाराला ? खरं पाहिलं तर तुझ्यासारखा सुखी तूंच.

**कृष्णः**— असं वरवर पाहणाऱ्याला वाटणं साहजीक आहे.

**नारदः**—म्हणजे !

**कृष्णः**—नारदा, जोंपर्यंत मनुष्य संसारात पडला नाही, तोंपर्यंत त्याला संसार सुखाचा वाटतो. पण खरं संसार रहस्य कळल्यावर, तो विटल्याशिवाय रहात नाहीं.

**नारदः**—कृष्णा, संसारात सुख नसतं, तर कुणीही संसारी झाला नसता. कां सत्यभामे मी म्हणतों खरं की नाहीं ?

**सत्यः**—मला काय ठाऊक ? त्यांनाच विचारा.

**नारदः**—म्हणजे ? आजचा रंग काही निराळाच दिसतो. कलहाशिवाय संसाराला शोभा नाहीं. कृष्णाला तर काय रोजचं अंगवळणी पडलेलं आणि सत्यभामेचा रोष देखील कारणापुरता असतो. कृष्ण–सत्यभामेचा प्रेम–कलह पहायला देखील नशीब लागतं. मी वेळेवर आलों म्हणायचा.

**कृष्णः**—कशाला कळ लावायला की काय ?

**नारदः**—नाही. समजूत पाडायला.

**सत्यः**—असं झालंय तरी कधीं ? कळागत लावणं, हाच तुमचा रोजचा व्यवसाय.

**नारदः**—त्यामुळं कुणाचं अकल्याण झालं आहे का ? मी लोकांच्या कल्याणासाठी कोणतीही गोष्ट केली, आणि शेवट त्याचा गोड झाला तरी माझे आभार मानायचे राहिले बाजूला, उलट "कलि–नारद" म्हणून अहेर मिळतोच मला. तेव्हां यापुढं त्याच्यापासून सावध राहण्याचा मी निश्चय केला आहे. पण या द्वारकेंत पाय ठेवल्यापासून जाणारे येणारे लोक माझ्याकडे वाईट नजरेनं पाहतात.

**कृष्णः**—हें काय नवीन बुवा ! बायकांकडे वाईट नजरेनं पाहतात, असा आजपर्यंत पुरुषांवर आरोप येत होता. पण नारदा, तुझ्याकडे वाईट नजरेनं पाहण्यांत, लोकांचा काय हेतु असणार बरं ?

**नारदः**—कृष्णा, शब्दछळ करण्याची तुला फारच संवय. साध्या शब्दाचा सरळ अर्थ तुला माहीतच नाही. म्हणूनच सत्यभामेचं आणि तुझं जमत नाही. नाहीतर आज तुला काय कमी आहे ? स्वर्गीय अप्सरांनादेखील लाजविणाऱ्या सुन्दर स्त्रिया आणि पदरी गजांत लक्ष्मी—

**कृष्णः**—म्हणूनच संसाराला कंटाळलों आहे.

**नारदः**—म्हणजे ?

**सत्यः**—म्हणजे काय ? एकीशीं त्यांचं मन गुंतल्यावर, दुसरीची त्यांना महिनेच्या महिने देखील आठवण होत नाही, आणि तसं तिनं बोलून दाखविलं म्हणजे मग संसाराचा कंटाळा येतो.

**नारदः**—कृष्णा, समतोल दृष्टीनं विचार केला, तर सत्यभामेचं बोलणंच बरोबर आहे. आणि सगळा दोष तुझ्याकडे येतो. तुला सोळा सहस्र अष्टनायिका, तेव्हां सगळ्यांकडे समदृष्टीनं पहायला नको कां ?

**कृष्णः**—नारदा, तुला संसारी दृष्टी नाहीं. पुरुषांची एक वेळ समजूत पाडतां येईल. पण एकदा स्त्रियांच्या मनात, सवतीमत्सराग्नी पेटला कीं, मेघाच्या अतिवृष्टीनं देखील शांत होणार नाही. त्यात एका स्त्रीची समजूत कुणीही करील; पण जिथं सोळा सहस्र अष्टनायिका, तिथं सगळया स्त्रियांची समजूत पाडायला, नवऱ्याला त्यांच्या दुप्पट तोंडं असली तरी अपुरीच पडणार. तुला अजून संसाराचा अनुभव नाहीं, म्हणूनच तूं स्त्रियांचा कैवारी आहेस.

**नारदः**—तो अनुभव घेण्याचा मी निश्चय केला आहे. पण त्याला तुझं पाठबळ पाहिजे.

**कृष्णः**—म्हणजे ?

**नारदः**—संसाराचा अनुभव घेण्याचा माझा विचार आहे.

**सत्यः**—म्हणजे तुम्ही लग्न करणार ?

**नारदः**—मी लग्न करूं नये की काय ?

**सत्यः**—संसारांत सुख नाही, म्हणून आतांच दिलेल्या उपदेशाचा तुम्हाला विसर पडला कीं काय ?

**नारदः**—सत्यभामे, माझ्यासारख्या सन्याशाला सुद्धां, संसारी होण्याची इच्छा झाली, ती संसारांत सुख आहे म्हणूनच ना ?

**सत्यः**—पण इकडे वीट आला आहे ना संसाराचा?

**नारदः**—एकाच स्थितीत माणसाला कंटाळा येणं साहजीक आहे.

**कृष्णः**—म्हणूनच तूं दुसऱ्या स्थितींत येऊं पाहतोस. नारदा, तुझ्या-सारख्या बाल-ब्रह्मचाऱ्याला, या संसाराच्या जंजाळयात पडण्याची कुठून दुर्बुद्धी आठवली? या स्त्री-संग्रहालयातून माझी सुटका होईल, तर त्याच्याबरोबर सारी संपत्ती बहाल करायला माझी तयारी आहे.

**सत्यः**—जशा काहीं विकतच आणल्या असतील कीं नाही आमच्या वाटेल तशी विल्हेवाट लावायला? आम्ही जाऊं देऊं तेव्हा ना तुम्हीं सन्यास घेणार?

**कृष्णः**—पाहिलंस नारदा, दोन्ही बाजूनी कशी माझी कुचंबणा होते ती? सन्यास घेऊं देईना आणि सुखानें संसार करूंही देईना, मग तूंच सांग मी काय करावं तें?

**सत्यः**—अखेर मीच वाईट आणि आपण चांगले असंच ना? खासा न्याय! नारदमुनी, पट्टराणी म्हणून मान मिळविण्याच्या ऐवजी अपमानाचे आघात मात्र मला पदोपदीं सहन करावे लागतात.

[ भीमपलास—त्रिवट ]

**नच माना देति बहुमाना ॥ भाव दुजा हृदयाचा परि जाणा ॥ धृ० ॥ वचनीं मधुरा दाविति माया ॥ भुरळ मनाला दावा धराया ॥ साधाया स्वार्थ सकल कावा ॥ भामा जाणतोचि या ध्याना ॥ १ ॥**

**नारदः**—कृष्णा, सत्यभामा तुझी पट्टराणी म्हणून तरी तिचा मान तूं राखला पाहिजेस.

**कृष्णः**—मी तर प्रत्येक गोष्टींत भामेलाच पहिला मान देतों. पण मान राखून घेण्याला देखील मोठं मन लागतं. ही तर क्षुल्लक कारणासाठीं देखील वर्दळीवर येते आणि मग मलाच वाद मिटवावा लागतो.

**सत्यः**—मी वर्दळीवर येतें आणि रुक्मिणी मूग गिळून स्वस्थ बसते वाटतं?

**कृष्णः**—तिची एका शब्दानं समजूत घालतां येते. तुझा हट्ट पुरा केल्या-खेरीज तुझी समजूतच पटत नाही.

**सत्यः**—म्हणजे मी वाईट आणि ती चांगली असंच कीं नाही? नेहमी तुम्ही तिच्याच गुणांचे कौतुक करता.

**कृष्णः**—नारदा, गुणाची पारख कृतीच्या वेळीं होते खरं की नाही?

**नारदः**—ही गोष्ट कुणालाही नाकबूल करतां येणार नाही.

**सत्यः**—नारदमुनी, तुम्ही देखील त्यांचीच "री" ओढूं लागलांत.

**नारदः**—मी केव्हांही खोटं बोलत नसतों. सत्याची बाजू उचलून धरणंच माझं कर्तव्य आहे.

**सत्यः**—बरोबरच आहे, तुम्हांला संसार थाटायचा ना, तेव्हा तुम्ही आता त्याचीच बाजू उचलून धरणार.

**कृष्णः**—नारदा, वेळ आली म्हणून बोलतों. नाही तर मला कशाला बायकांच्या उठाठेवी करायला पाहिजेत? तुला तरी आठवत असेल सुम-संग्राम?

**नारदः**—सुम-संग्रामाचा प्रसंग चिरस्मरणीय आहे आणि त्याची साक्ष सत्यभामेच्या दारातील पारिजातक देत आहे.

**कृष्णः**—त्यासाठीं भामेनं केलेला सत्याग्रह.

**सत्यः**—आणि तुमच्या आवडतीचा आग्रह.

**कृष्णः**—पण शेवटी तुझा सत्याग्रहच यशस्वी ठरला. तुझ्या दारीं पारिजातकाचं झाड—

**सत्यः**—आणि आवडतीच्या दारीं फुलं. म्हणजे मलाच सवतीच्या दारीं फुलं वेचायला लावलीत.

**कृष्णः**—फिरून तुझा आहेच माझ्यावर आरोप.

**नारदः**—सत्यभामे, यात कृष्णाचा काय अपराध? हा भक्ति-प्रभाव आहे. नाहीं तर एकीच्या घरी झाड आणि दुसरीच्या दारीं फुलं, असलं विश्व-वैचित्र्य घडून येईल तरी कसं!

**सत्यः**—भक्ति-प्रभाव कीं रुक्मिणी-महात्म्य? मग तिची पूजा फुलांनींच करायला नको कां? कारण ती भक्तीण. भक्तिणीला प्रसन्न करून घेतल्याखेरीज देवाची कृपा कशी होईल आमच्यावर?

**कृष्णः**—झाली सुरवात सवती मत्सराला. नारदा, हें असं आहे माझं संसार-सुख. असाच प्रत्येकीच्या महालात, सवती मत्सराग्नी पेटत असतो. तो शांत करायला जिवाचं पाणी करावं लागतं मला. यांपेक्षा कुणाचंही पाणीग्रहण केलं नसतं, तर सुखांत तरी राहिला असता एकजीव. पण आता बोलून काय उपयोग ? प्रत्येकीचा मान-मरातब राखीत गेलों, म्हणजे माझी मान वाकल्याशिवाय राहणार नाहीं. मग मला डोकं वर काढायला मला फुरसद कुठून असणार ? आणि तूं म्हणतोस, तुझा संसार उभा करायला माझं पाठबळ पाहिजे म्हणून.

**नारदः**—कृष्णा, तू मनावर घेतल्यावर तुला कोणती गोष्ट अशक्य आहे ? सत्यभामेची समजूत मी करतों. माझा संसार थाटण्याच्या कार्यात तूं मला मदत कर. का सत्यभामे, ही तडजोड तुला मान्य आहे ना ?

**सत्यः**—एका बाल-ब्रह्मचाऱ्याला संसारी करण्याच्या पुण्याच्या आड मी कशी बरं येईन ?

**नारदः**—मग कृष्णा, तुला मान्य आहे ना ही तडजोड ?

**कृष्णः**—तात्पुरती ही तडजोड मला मान्य आहे. पण नारदा, तुझा संसार उभा करण्याच्या कार्यात, माझी मदत तुला कितपत उपयोगी पडेल, याची काळजी आतांपासून मला लागली आहे. एकूण काय, एका काळजीतून तात्पुरता मुक्त झालों नाहीं तोंच, दुसरी काळजी लागलीच माझ्या पाठीमागं. पण तें काहींही असले तरी, तूं माझा भक्त असल्यामुळं तुझा संसार थाटण्याकरितां, मला वाटेल तो त्रास सोसलाच पाहिजे.

(पडदा)

---

## प्रवेश २ रा.

**स्थळः**—पेंद्याचं घर ( पेंद्याची बायको ताक करीत आहे असा पडदा उघडतो. )

**पेंद्याः**—मंथरेचं मंथन चाललं आहे वाटतं ? अगदीं एकजीव झाला आहे त्याच्याशीं, ही देवाची दयाच म्हणायची माझ्यावर. आतां तोंड चुकवून

घरांत जावं म्हटलं, तर दाराशीं तोंड करून बसल्यामुळं, आयताच तोंडी सांपडायचा. होता होईल तों तोंडा तोंडी नको, म्हणून तोंड चुकविण्याचा प्रयत्न करतों, पण आज मात्र पुरा तोंडघशी पडणार. धरणं देऊन बसलेल्या देणेकऱ्याला देखील भ्यालों नाहीं अगर भिणारही नाहीं.

**मंथराः**—( पेंद्याला पाहून ) फावलं कां एकदांचं घरीं यायला इतक्या लौकर ?

**पेंद्याः**—न येऊन करतों काय ? तुझ्या मंथनांत अडथळा येऊं नये, म्हणून केव्हांचा धुसळखांबा सारखा उभा आहे.

**मंथराः**—हालाल कसे ? चाहूल ऐकूं येईल ना मला ? चोरवाट शोधीत होतां वाटतं चोरासारखे ?

**पेंद्याः**—हें तुला कसं कळलं ?

**मंथराः**—तुमच्या रोजच्या रिवाजावरून.

**पेंद्याः**—तूं थोडीच मंथन करीत असतेस रोज मी घरी येण्याच्या वेळी ?

**मंथराः**—म्हणूनच तुम्हांला सापडत होतं मला फसवायला.

**पेंद्याः**—तुला फसवून माझा काय निभाव लागणार आहे आतां ? एकदां फसलोंच आहे कीं तुझ्याशीं लग्न करून.

**मंथराः**—तुम्ही फसलात की मी फसलें तुमच्या पदरी पडून ?

**पेंद्याः**—मी कुठं पदर पसरला होता तुझ्या बापापुढं ? तोच येऊन माझ्या गळीं पडला, म्हणून ही घोरपड गळ्यांत बांधून घेतली नाहीं तर—

**मंथराः**—नाहीं तर काय ?

**पेंद्याः**—लग्नाला उभाच राहिलों नसतों.

**मंथराः**—एकूण उपकार झाले म्हणायचे तुमचे माझ्या बापावर ?

**पेंद्याः**—हो, हो, त्यांत काय खोटं आहे ? तुझा बाप जिवंत असता, तर त्याच्याकडूनच कबूल करून घेतलं असतं तुझ्यापुढं.

**मंथराः**—कशाला उगीच माझ्या बापाचं नांव पुढं करतां ? ते जिवंत नाहींत म्हणूनच तुम्हांला फावलं माझा छळवाद करायला. नाहीं तर केव्हांच गेलें असतें माहेरीं मुलांना घेऊन.

**पेंद्याः**—कुबेरच पडला होता की नाही तुझा बाप, तुला आणि तुझ्या पोरांना पोसायला !

**मंथराः**–कुबेर नव्हते, तरी पोटापाण्याची काही कमतरता नव्हती घरात.

**पेंद्याः**—तें दिसत होतंच चद्रमौळी घरावरून. मेलेल्या म्हशीला बारा शेर दूध तशातलं तुझं बोलणं. इथं तरी आता तुला कोणती उणीव आहे ? दूधदुभत्याला दुष्काळ नाही नी पोराबाळांची उणीव नाहीं ! एवढी देवाची दौलत घरी असताना, पोटापाण्याची कसली काळजी बाळगतेस ?

**मंथराः**—गुराढोऱ्हांचे काबाडकष्ट केल्याखेरीज का दूधदुभतं दृष्टीला पडणार नी पोरांचं पोट भरणार ? तुमच्या हातून तर इकडची काडी तिकडे होत नाहीं. उलट गिळायला वेळेवर मिळालं नाही, तर मात्र सन्यास घेण्याची भीति घालतां मला.

**पेंद्याः**—खोटी भीति घालीत नाही, खराच मी सन्यास घेणार आहे.

**मंथराः**—नाहीं तरी तुमचा काय उपयोग होतो मला संसारात ? अगोदरच संसाराचा सन्यास चालवला आहे मग कशाला उगीच तोंडाची वाफ दवडतां सन्यास घेणार म्हणून ?

**पेंद्याः**—तूं मात्र वायफळ तोंड सोडलंस खरं. खरोखरच मी सन्याशी झालों आहे.

**मंथराः**—भगवी वस्त्रं कुठं दिसत नाहीत अंगावर ?

**पेंद्याः**—मी अजून पुरा सन्याशी झालों नाही. संसारी सन्यास आहे म्हणून पोशाखांत फेरबदल केला नाही. मंत्रोपदेश देखील घेतला गुरुकडून.

**मंथराः**—कुठला गुरु भेटला मंत्रोपदेश द्यायला ? असेल कुठला मला बोके संन्याशी.

**पेंद्याः**—हं ! हें मात्र मला खपणार नाहीं. मंथरे, तूं पाहिजे तर मला मला म्हण, पण गुरूला अपशब्दाचा अहेर केलेला मला आवडणार नाही. सन्यास घेणं म्हणजे संसारी सृष्टीला मेल्यासारखंच नाहीं कां ? माझा गुरु असा तसा नाहीं–तर देवांना देखील वंद्य आहे.

**मंथराः**—ऐकूं द्या तर खरं तुमच्या गुरुचं नांव.

**पेंद्याः**—माझ्या गुरुचं नांव माहीत नाहीं, असा नांवालादेखील एक

मनुष्य सांपडायचा नाहीं. ते जर इथं आले असते, तर तुला देखील त्यांना नांव ठेवतां आलं नसतं.

**मंथरा**:--म्हणूनच त्याचं नाव ऐकायला मी उतावीळ झालें आहे.

**पेंद्या**:--अशा तुझ्या उतावळ्या स्वभावामुळेंच, सुखाचा अभाव आहे घरांत. स्वभावाला औषध नाहीं म्हणतात, तें खोटं नाहीं. त्याला तूं तरी कुठून अपवाद असणार? माझ्या गुरुचं नाव ऐक; तिन्ही लोकी स्वयंप्रेरणेनं संचार करणारे-इंद्रादी देवाना देखील पूजनीय असणारे-सृष्टिकर्ता ब्रम्हदेवाचे मानसपुत्र बालब्रह्मचारी--

**मंथरा**--रिकामटेकडा-गावभटक्या-कळफिरव्या कली नारद होय ना? नाहीं तर असली कलागत त्यांच्याशिवाय कोण लावणार?

**पेंद्या**:--ही कलागत का? छान छान डोकं चालवलंस! त्यांचा काय फायदा होणार आहे माझ्या सन्याशानं? उलट परब्रह्म स्वरूपाचा सन्मार्ग दाखविल्याबद्दल, त्यांचे जन्माचे आभार मानले पाहिजेत.

**मंथरा**:--इथं आले असते, तर त्यांचे चांगलेच आभार मानले असते.

**पेंद्या**:--उगीच तोंड आहे म्हणून तोंडसुख घेऊं नकोस सत्पुरुषावर आपली दोघांची तोंडातोंडी होते तेवढी पुरे. त्यांच्या उपदेशाप्रमाणं, कांहीं काळ मला घरींच समाधिस्थ झालं पाहिजे. चल आंत आणि कर माझ्या आसनाची तयारी. तितक्यात मी स्नान करून येतों. (अंत जातो.)

**मंथरा**:--खरंच का आहे संन्यास घेणार? कां आपलं रोजचंच रडगाणं कांहीच कळत नाहीं. खराच यांनी संन्यास घेतला तर--(नारदाला पाहून) ही आलीच मागोमाग नारदाची फेरी.

**नारद**:--का हो, आहे कां घरांत पेंद्या?

**मंथरा**:--काय काम आहे तुमचं त्यांच्याजवळ?

**नारद**:--त्याच्यावरच माझं जीवनसर्वस्व अवलंबून आहे.

**मंथरा**:--असणारच!

**नारद**:--म्हणजे? त्यानं सांगितली कां तुम्हांला माझी सारी हकीकत!

**मंथरा**--चोरून केलेल्या गोष्टी चव्हाट्यावर आल्याशिवाय कशा राहतील?

**नारद**:—नाहीं तरी मी तुम्हांला सांगणार होतोंच म्हणा. पण त्यानंच तुम्हांला सांगितल्यामुळं, तेवढा सांगण्याचा त्रास चुकला. मी आखलेला मार्ग चांगला आहे ना?

**मंथरा**:—चांगला तर? असा कुणालाही सुचला नसता! पण कां हो, यामुळं तुमचं काय कल्याण होणार आहे?

**नारद**:—नुसतं कल्याण नव्हे तर माझं कोट-कल्याण होणार आहे. म्हणूनच मी हा मार्ग स्वीकारला. तुम्हांला नाहीं वाटतं?

**मंथरा**:—माझ्या वाटण्यावर आतां थोडंच अवलंबून राहणार आहे? तुम्ही दोघांनींही मसलत केलीत आणि आतां मला विचारतां?

**नारद**:—कुठलीही गोष्ट चार-तोंडी होण्यापूर्वीच सारासार विचार करावा लागतो.

**मंथरा**:—तुम्हीं सारासार विचार केलात का या गोष्टीबद्दल? कां स्वतांपुरतं पाहिलंत.

**नारद**:—त्यांत दुसऱ्याचं काय कल्याण होणार आहे? मी बाल-ब्रह्मचारी, ते हां कुणालाही ही गोष्ट कळली, तर प्रथम दर्शनीं अचंबा वाटणारच. कदाचित ब्रह्मचारी बहकला म्हणतील. पण जो तो स्वतापुरतं पाहतो. त्याला दुसऱ्याच्या दुःखाची कल्पना कुठुन असणार?

**मंथरा**:—खरं बोललांत, तोच प्रश्न मी तुम्हांला विचारला तर?

**पेंद्या**:—त्यांत मला वाईट वाटणार नाही.

**मंथरा**:—दुसऱ्याच्या वाईटावर उठलेल्या माणसाला, स्वताचं वाईट वर्तन दिसत नाहीं.

**पेंद्या**:—तुमच्या दृष्टीनं माझ्या हातून कुठं चुकभूल होत असली तर सांगा, अजूनही सुधारतां येईल.

**मंथरा**:—मी तरी तेंच म्हणते. संन्यास घेण्यापूर्वी संसाराचा विचार करावा अगर संसार करण्यापूर्वीच सन्यासाचा विचार करावा म्हणजे संसाराचं स्मशान होत नाहीं.

**नारद**:—म्हणूनच मी पेंद्याला गुरु केला.

**मंथरा**:—तुम्हीं केलांत कां त्यांनीं तुम्हांला गुरु केला?

**नारदः**—संसाराचं कोडं उलगडायला पेंद्याहून दुसरा संसारी नाही, म्हणून मी त्याला गुरु केला.

**मंथराः**—म्हणजे ?

**नारदः**—मी संसारी होणार आहे.

**मंथराः**—आणि दुसऱ्याचा संन्याशी करणार असं ना ? दुसऱ्याच्या घरावर तुळशी पत्र; त्यात तुमचं काय जातं म्हणा ! पण अशी संसाराची राख करण्याची कलागत लावून, तुमचं कोटकल्याण का होणार आहे ? उलट संसारी स्त्रियांचे तळतळाटच तुम्हाला भोंवतील.

**नारदः**—कोण हा गहजब !

**मंथराः**—गहजब ! करून सवरून नामानिराळे ! म्हणूनच सारं जग तुम्हांला कळी नारद म्हणतं. संसाराचा सन्यास घ्यायला लावणारे तुम्हीच ना त्याचे गुरु ? दुसऱ्याच्या संसाराचं वाटोळं करून तुम्ही स्वताचा संसार साजरा करणार ? मग या वीणा, चिपळ्यांची साथ कशाला, लोकांच्या डोळ्यात धूळ फेकायला ?

**नारदः**—बाई, शांत व्हा. असं रागावूं नका माझ्यावर. मी काय म्हणतों तें ऐकून घ्या.

**मंथराः**—संसाराची धूळधाण उडत असलेली पाहून देखील मी रागावूं नये ? वीणा, चिपळ्यांवर पोट भरण्याचा व्यवसाय सोडून, संसाराचं वेड कुटुन भरलं तुमच्या डोक्यांत !

**नारदः**—मी संसारी होऊं नये, अशी तुमची इच्छा ?

**मंथराः**—तुम्ही संसारी व्हा, नाही तर भणंग भिकारी व्हा, त्याची मला पर्वा नाहीं. पण त्यांच्या अंगाला अशी सन्याशाची राख लावायला तयार झालात म्हणून बोलतें मी. मी गांवाची मंथरा आहे. माझ्या संसारांत अशी नसती ढवळाढवळ केलेली मला खपणार नाहीं सांगून ठेवतें. आले तसे चालते व्हा आणि यापुढं इथं याल, तर तुमच्या या चिपळ्या वीणेचा प्रयोग तुमच्यावरच करावा लागेल.

**नारदः**—आग्यासारखं आजचा दिवस तरी मला त्याला भेटू दे. एका बालब्रम्हचाऱ्याला संसारी करण्याचं पुण्य पदरीं घ्या.

**मंथराः**—आणि मी हातांत पोलपाट लाटणं घेऊन घरोघर फिरावं असंच ना? तुम्हाला इथं आता क्षणभरसुद्धा राहू देणार नाही. जातां की नाही इथून! (ताकाची रवी घेऊन नारदाच्या मागं लागते, तो पळून जातो.)

---

## प्रवेश ४ था.

**स्थळः**—महाल. पात्रें (जांबुवंती, नारद आणि कृष्ण)

**जांबुवंतीः**—देवा, आपलं दर्शन या जांबुवंतीला कां बरं होत नाही? का मी कुरूप आहे म्हणून कानाडोळा करतां? दयाघना, भक्तीला कुरूप आणि सुरूप हा भेदभाव असतो का? का माझ्या भक्तींत कुठं चुकभूल झाली? भक्ती आंधळी असते. आंधळेपणामुळं झालेली चुकभूल, देवानं पावन करून घ्यायला नको का? मग माझ्याशीं हा रुसवा का? बोला ना! आपण हा अबोला टाकून, माझ्याशी एक वेळ का होईना बोललां नाहीत, तर या जांबुवंतीचं बरं वाईट झालं, मग तिला नाही बरं बोल लावायचा. मी इतकी जीव तोडून बोलतें, तरी अजून आपला अबोलाच!

(पहाडी—केरवा)

**देव भुकेला विमलभावा॥ लांछन ये तव नांवा॥ धृ०॥**
**अंतर पडलें स्वीकारिसेवा॥ जाणसि अंतरि निर्मल**
**भावा॥ अंधभक्तिला भेद न ठावा॥ आतुर दर्शनिं**
**देवा॥ १॥**

**नारदः**—[प्रवेश करून] जांबुवंती, कुणाशीं जिवाभावाचे बोल बोलते आहेस?

**जांबुः**—कोण नारदमुनी? या बसा या आसनावर. जीवाभावाच्या बोलानं मी देवाला आळवीत होतें.

**नारदः**—कोण! कुठला देव?

**जांबु:**—आपण देवाला ओळखीत नाहीत?

**नारद:**—ओळखीचा देव कुठला बुवा हा?

**जांबु:**—देवाला न ओळखण्याचं सोंग आणून, आपण माझ्याशीं फसवा-फसवी केलीत, तर मी काहीं तशी फसायची नाही बरं का!

**नारद:**—तुझ्याशी फसवाफसवी करून मला काय तुझ्या देवाकडून मिळवायचं आहे? देवाचे देव्हारे माजविले कीं तो शिरजोर होऊन देव्हारे माजविण्यालाच जेरीला आणतो. जांबुवंती, तुझ्या देवाचं नाव ऐकूं दे!

**जांबु:**—माझा देव-श्रीकृष्ण.

**नारद:**—कृष्ण आणि तुझा देव? भोळाभाव आहे झालं.

**जांबु:**—म्हणजे?

**नारद:**—देव्हाऱ्यांत देव नसतांना भक्तिभावानं आळविलं, तर दुसऱ्या भक्तिणीच्या भक्तींत एकरूप झालेला देवाला तुझी हांक कुठली ऐकूं येणार?

**जांबु:**—भक्तिभावानं देवाला वश करून घेतां येणार नाहीं का?

**नारद:**—मी कुठं नाही म्हणतों? पण जाग्यावर देव असेल तर ना? जांबुवंती तुझ्यापेक्षा मी कृष्णाला चांगला ओळखतों.

**जांबु:**—एकूण आपण देवाला ओळखता तर! मग माझ्याशीं कशाला आपण न ओळखण्याचं सोंग आणलंत? नारदमुनी, देवाच्या दृष्टीशी भक्तीनं भक्ताला एकजीव होतां येतं ना?

**नारद:**—पण दृष्टी आड सृष्टी, हेंमात्र विसरतां कामा नये. जांबुवंती, तुझ्या भक्तीची कळकळ कृष्णाला असती, तर इतका कंठशोष करण्याची पाळी तुझ्यावर कां आली असती? कृष्णाला देवपण देऊन तूं देव्हाऱ्यांत बसविल्या-मुळंच, त्याला तुझ्या भक्तीरसाची रूची नाहींशी झाली आहे. तीच सत्यभामा पहा, तिला कृष्णाच्या स्वभावाची पुरी पुरी ओळख झाली आहे. म्हणूनच नाकात वेसण घालून तिनं त्याला आपलासा करून घेतला आहे. ज्याला अनेक नायिका तो एकीचं घर धरून बसेल कां!

**जांबु:**—म्हणून मला देवाला दोष देतां येईल का?

**नारद:**—जाबुवंती, हें देवाचं वेड सोडून दे आणि सत्यभामेचा कित्ता घे. म्हणजे मग तोच कृष्ण तुझ्या दारीं धरणं देऊन बसेल.

**जांबु:**—पण देवाला असं तिष्ठत ठेवणं भक्ताला योग्य होईल का?

**नारद:**—फिरून ठेवलस पुढं देवभक्तीचं गांठोड. जाबुवंती, तुझं आजपर्यंतचं राहणं रानावनांत असल्यामुळं, शहरातल्या शार्दुलाच्या स्वभावाची तुला पारख झाली नाही. तुला कृष्णानं शहरात आणल्यापासून सत्यभामा, रुक्मिणी आणि मित्रवृंदा तर तुला पाण्यात पहात आहेत.

**जांबु:**—तें का म्हणून?

**नारद:**—सवतीमत्सरामुळं.

**जांबु:**—सवतीमत्सर?

**नारद:**—होय. जाबुवंती, स्त्रीला कागदी सवत देखील सहन होत नाहीं. मग इथं तर सोळा सहस्र अष्टनायिका. मग का बरं प्रत्येकीच्या मनात तुझ्याबद्दल सवतीमत्सर उत्पन्न होणार नाही? तशात त्या सर्व सुंदर आहेत.

**जांबु:**—आणि मी कुरूप आहे असंच ना? पण माझा काय बरं अपराध?

**नारद:**—तुझा नसेल पण कृष्णाचा आहे ना!

**जांबु:**—त्याचा काय म्हणून?

**नारद:**—तुला आणून सवतीत आणखी एक भर घातली म्हणून, तशात रानावनातल्या रहिवाशाना कुरूप सुरूपाचा भेदभाव कळत नसतो. पण शहरांतली शहाणी सुरती माणसं भेदभावाच्या दृष्टीनं पहात असतात. तेव्हा जाबुवंती, हा रानातला रानवटपणा टाकून शहरांतलं शहाणपण शिकली नाहीस, तर तुझा भोळाभाव नवसाला पावणार नाही.

( तिलक—कामोद—त्रिवट )

**साधा गणि न हरिला, वरि भोळा परि धरि अंतरिं भावा काळा ॥ धृ० ॥ जागत ना देवपणासि देव ॥ सहजीं यें भक्ति विरोध-भाव ॥ पथ वरिसि हाच पावे तुजला ॥ १ ॥**




**जांबुवंतीः**—कुठं ? इथं संसार थाटणार ?

**जांबु**:—आता श्रीकृष्ण कुठं बरं असतील ?

**नारद**:—असतील कशाला ? मी खात्रीनं सांगतों कीं यावेळी तुझा कृष्ण सत्यभामेशी सारीपाट खेळत बसला असेल.

**जांबु**:—तिथं मी गेलें तर भेटतील ना मला ?

**नारद**:—काय सवतीच्या घरी आणि सवतीला मोकळी वाट ? नाव घ्यायला नको ! आधींच तुझ्या नांवानं ती मनात जळते आणि तिथं तूं गेल्यावर तिच्या अंगाचा तिळपापड होईल. कदाचित तिथं तुझा अपमान देखील होईल. सवतीकडून सवतीचा अपमान झाला तर साहजीकच मत्सराग्नि भडकतो, कदाचित एकेरीवर येण्याचा संभव असतो. तसा प्रसंग टाळणंच शहाणपणाचं असतं. सत्यभामेच्या आणि तुझ्या भांडणात, श्रीकृष्ण तुझी बाजू संभाळील याची आशाच करायला नको. उगीच आगीतून उठून फोफाट्यांत पडल्यासारखं होईल.

**जांबु**:—मग कृष्णाला माझा निरोप—कां दचकलांतसे ?

**नारद**:—दचकलों नाही. तुझ्या सवती सवतीच्या सामन्यात, श्रीकृष्णाचा निरोप मी तुला सांगायला विसरलोंच.

**जांबु**:—काय निरोप पाठविला आहे ?

**नारद**:—होय. पण तो मान्य करण्याची तुझी कबुली आहे कां ?

**जांबु**:—निरोप कसला ? देवाची आज्ञा ती. भक्तानें ती मोडली असं कधीं तरी झालं आहे कां ?

**नारद**:—संभव नसला तरी शंका येत, म्हणून सूचना दिली.

**जांबु**:—बोला, बोला, काय आज्ञा आहे ती ?

**नारद**:—जांबुवंती, कुठल्या शब्दानें सांगूं आणि काय सांगूं ? जिभेवर आलेले बोल ओठाबाहेर येत नाहींत. हृदयाची भाषा हृदयालाच कळते.

**जांबु**:—मग ती मला सांगा.

**नारदः** —सांगूंच तर ! संसार ! जांबुवती, संसाराचं रहस्य अजून तुला समजलं नये ? दुसऱ्याचा संसार पाहून, संसारी बनाव, म्हणून मी पेंद्याला माझा गुरु केला.

**जांबुः**—पेंद्याला गुरु ? नारदमुनी, वेड तर झाले नाहीत तुम्ही ?

**नारदः**—खरंच मला संसाराचं वेड लागलं आहे, म्हणून पेंद्याच्या मध्यस्थीनं संसारी होण्याचा प्रयत्न करूं लागलों, पण कुणीच माझ्या बोलण्याला कबूल होईना. तरी मी निराश झालों नाहीं. प्रयत्नांअंती परमेश्वर म्हणून शेवट तुझ्या कृष्णाला मध्यस्थी केला, त्याला भीड घातली आणि---

**जांबुः**—संसारी झाला का ?

**नारदः**—झालों नाहीं, आता होणार. पण रुकार मिळण्याची वाट पहातों आहे,

**जांबुः**—कसला रुकार ?

**नारदः**—मला संसारी करण्याचा.

**जांबुः**—मी नाहीं समजलें तुमचं बोलणं.

**नारदः**—मी बोलल्याखेरीज तुला कसं कळणार ? समजावून देतों. समज पडला तर माझा जीव खाली पडेल. मघाशीं मी तुला सांगितलंच आहे कीं मी श्रीकृष्णाला भीड घातली आणि पटकन त्यानं कबुली दिली.

**जांबुः**—काय कबुली दिली ?

**नारदः**—होय. आणि सांगितलं कीं "नारदा, तुला संसारी करण्याकरिता मी वाटेल तो स्वार्थत्याग करायला तयार आहे. जा, जिथं मी नसेन, तिथं तूं आपला संसार थाट, ही माझी तुला आज्ञा आहे." बोल, मग मला इथं संसार थाटता येईल का ?

**जांबुः**—कुठं इथं ?

**नारदः**—का तूं कबूल नाहीस की काय ?

**जांबुः**—पण देवांचीच आज्ञा आड येते ना ?

**नारदः**—म्हणजे ?

**जांबु**:—" मी जिथं नमेन तिथं तू आपला संसार थाट " अशी आज्ञा आहे ना ?

**नारद**:—होय.

**जांबु**:—मग तुम्हाला इथं संसार थाटता येणार नाही.

**नारद**:- तें का ?

**जांबु**:—इथं देव आहेत म्हणून देवांची आज्ञा मी कशी बरं मोडूं ?

**नारद**:—इथं श्रीकृष्ण आहे ?

**जांबु**:—नाही कुठे असं तुम्हाला वाटतं ? नारदमुनी, मी मघाशी बोलत होतें तें देवाशींच. ते मात्र तुम्हाला दिसले नाहीत. एवढाच काय तो फरक.

**नारद**:—काय मघाशीं तूं कृष्णाशीं बोलत होतीस ? मग मी आल्यावर तो कुठे गेला ?

**जांबु**:—गेले नाहीत. अजूनही इथं आहेत.

**नारद**:—कुठं आहे ?

**जांबु**:—देवाचं नाव घेतल्यावर, देव हजर झाले नाहीत, असं कधी होईल तरी का ? ते पहा ते पहा—ते पहा—( दुसऱ्या बाजूनें श्रीकृष्ण येतो त्याला पाहून नारद स्तंभीत होतो )

**कृष्ण**:—का नारदा, माझी आठवण केलीसशी ?

**नारद**:—कोण श्रीकृष्ण ?

**कृष्ण**:—गांगरलास का ? तूं आठवण काढलीस आणि जांबुवंतीनं हाक मारली म्हणून हाकेसरशी धावत आलो.

**नारद**:—कृष्णा, तूं मला अशा रितीनं तोंडघशी पाडलंस अं ?

**कृष्ण**:—अखेर तूंच मला दूषण देतोस ? छान ! तूंच माझी हिच्याजवळ निर्भत्सना करीत होतास, सवती मत्सरानी पेटवीत होतास आणि एवढी कलागत लावून सुद्धां, तुला आपला स्वार्थ साधून घेता आला नाही, त्याला मी काय करणार ?

**जांबु:**—देवा—

**कृष्ण:**—तूं काय बोलणार आहेस, हें मी समजलों. तुझ्या भोळ्या भावाची फसवणूक करण्याचा नारदाचा स्वार्थ होता. पण आजपावेतों जगाच्या कल्याणासाठीं, नारदानें निःस्वार्थीपणानं केलेली कामगिरी लक्षात घेता, त्याच्या संसारातल्या स्वार्थाकडे दुर्लक्ष करणं योग्य नाही का? नारदा, इतका तूं भांबावून गेलास कां? तुझ्या संसार थाटण्याच्या प्रयत्नाला पायबंद पडला म्हणून निराश होऊं नकोस. संसार थाटण्याच्या मार्गात असे काटेकुटे आडवे यायचेच.

( देश—त्रिताल )

**आपदा सर्वं संसारा ॥ सौख्या अविरत या जगिं ना**
**थारा, संपदा ॥ धृ० ॥ सुखदमान्य पथिं कंटक येतां ॥**
**नच त्यजिति सुजन कार्या ॥ सेवी बोधा या सदां ॥१॥**

( पडदा )

[ अंक पहिला समाप्त. ]

---

# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**—महाल. **पात्रें**—( नारद, सत्यभामा, कृष्ण आणि जांबुवंती)

**नारदः**—पेंद्याच्या ओळखीनं संसारी होण्याचा संभव नाहीं, म्हणून कृष्णाच्या सल्ल्यानं वागूं लागलों, पण तिथेंही निराशाच! सोळा सहस्र अष्ट-नायिकेचा कंटाळा कृष्णाला आला असेल, म्हणून प्रत्येकीच्या महाली कृष्ण नसल्याच्या आशेनं जातों, पण कृष्ण नाही असं एकही ठिकाण न दिसल्यामुळं, निराशेनं परत यावं लागलं. शेवटी जांबुवंतीसारख्या अस्विलिणीकडे तरी कृष्ण ढुंकून पाहणार नाहीं, याची खातरजमा करून संसार थाटण्याचा घाट घालतों, तर तितक्यांत कृष्ण दत्त म्हणून समोर उभा. खरं पाहिलं तर तिच्यासारख्या अस्विलिणीशीं संसार थाटण्याची दुर्बुद्धी, कृष्णाशिवाय कुणालाही झाली नस्ती. " नाहीपेक्षां बरं " या हेतूनं मी तिच्याशी संसार करायला तयार झालों. तिथेंही नामोहरम झाल्यामुळं, मी तर आतां अगदी निराशवादी झालों आहे. का माझ्या नशिबीं संसारच नाही? नशिबीं नाहीं म्हणून श्रीविष्णूकडे परत जावं, तर लक्ष्मीसमोर माझी नालस्ती झाल्याशिवाय राहणार नाही. आतां शेवटचा प्रयत्न सत्यभामेशीं संधान जुळलं तर संसारी होणार, नाहीं तर चिपळ्यावीणेच्या सहवासांतच सारं आयुष्य घालवावं लागणार. ( सत्यभामा येते )

**सत्यः**—कां? नारदमुनी, आज दाराबाहेर उभे राहून कसला विचार करतां?

**नारदः**—लग्नाचा!

**सत्यः**—अजून तुमचं लग्न झालं नाहीं? खरं पाहिलं, तर श्रीकृष्णाचं पाठबळ तुम्हांला मिळालं असतां, तुमचं लग्न होऊं नये म्हणजे नवलच नाहीं का?

**नारदः**—झालं नाहीं हें खरं. सत्यभामे, कृष्णानं माझ्याशीं कपट केलं.

**सत्यः**—कपट आणि तें कां?

**नारद**:—सत्यभामे, कपटी कृष्ण म्हणतात तें उगाच नाही. वरून साधा भोळा पण आंतून काळा. मोठ्या औदार्याचा आव आणून सांगितलं की "नारदा, मी जिथं नाही तिथं तूं आपला संसार थाट म्हणून" आणि शेवटी तोच माझ्या संसाराच्या आड आला. (सत्यभामा हंसते) हंसतेस का सत्यभामे?

**सत्य**:—हंसू नको तर काय करूं ?

**नारद**:—माझ्या मनाला काय वेदना होत असतील याची तुला कल्पना असती, तर तूं माझी किंवच केली असती.

**सत्य**:—किंव करण्यासारखी तुमची हांव नाहीं,

**नारद**:—सत्यभामे, संसाराची हांव ज्याला नाहीं त्याला संन्याशी म्हणावं लागेल. संसारी होण्यासाठीं कृष्णाची एवढी मनधरणी केली, तर त्यानं मला पावलोपावली फसवावं का ?

**सत्य**:—पण तुम्ही इथं दाराशी का घुटमळत होतां ?

**नारद**:–तुझ्या महालांत कृष्ण आहे कीं नाहीं याची खात्री करण्याकरितां.

**सत्य**:—मग आंत कां आला नाहींत खात्री करायला ? तुम्हीं काहीं आम्हांला परके नाहीत. असं परक्यासारखं वागून तुम्ही मात्र आपलेपणा अुगारूं लागलांत. ही भामा सत्याला चहाते. आपला सात्विक स्वभाव मला पूर्ण माहीत आहे. मग आत यायला दुजाभाव का दर्शविलांत ?

**नारद**:—सत्यभामे, तुझ्या अंतःकरणांत दया आहे म्हणून मी इकडं येण्याचं धाडस केलं. मित्रवृंदसारखी "मनांत एक आणि जनांत दुसरं" असा दुजाभाव बाळगणारी तूं नाहींस. माझ्यावर तुझा पूर्ण भरंवसा म्हणूनच तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास, पण दुधानं तोंड भाजलं कीं मनुष्य ताकदेखील फुंकून पितो. काय सांगूं सत्यभामे, कृष्ण आंत नाही म्हणून तुझ्या प्रत्येक सवतीच्या महालात गेलों तर एकीकडे कृष्ण सारीपाट खेळत आहे, तर दुसरीकडे झोपाळ्यावर झोके घेत आहे, अशा निरनिराळ्या रसरंगांत तो रंगून गेला आणि माझा मनोभंग केला, म्हणूनच तुझ्या महालांत येण्याचं धाडस माझ्याकडून झालं नाहीं.

**सत्य:**—माझ्या महालांत तरी नारदमुनींचा मनोभंग होणार नाहीं. माणसाची पारख करण्याची दूरदृष्टी त्यांना कुठं आहे? अतिथी, अभ्यागतांना विन्मुख न करणंच प्रत्येक कुल स्त्रीचं कर्तव्य आहे.

[ मिश्र–झिंझोटी–केरवा ]

**विनय हा स्त्रियांना भूषणा ॥ रमणि वरिता, सगुणा गणा ॥ धृ०॥ अतिथि सुजना सदनिं येतां ॥ हंसत मुख तयां कुशल-कांता ॥ पुरवि मनिषा आदरूनियां ॥ गृहिणी पद तिला उचिता गुणा ॥ १ ॥**

**नारद:**—आपल्या कर्तव्याची जाणीव कुठं आहे त्यांना?

**सत्य:**—खरं बोललात. पण तिकडे त्यांच्याबद्दल अभिमान वाटतो ना!

**नारद:**—वाटणारच! "खालीं मुंडी आणि पाताळ धुंडी" अशा त्या आंतल्या गाठीच्या आहेत. कृष्णाच्या सान्निध्यांत तुझ्याबद्दल आदर दाखवितात, त्यामुळं साहजीकच त्यांच्याविषयीं त्याला आदर वाटतो. पण तुझा स्वभाव त्याच्या उलट!

**सत्य:**—म्हणजे मी भांडखोर कजाग कीं काय?

**नारद:**—हें पाहिलंस भामे, माझं पुरं बोलणं ऐकून घेतल्याखेरीज, तूं मनाचा भलताच ग्रह करून घेतलास. तूं सत्य बोलणारी म्हणूनच तुझा आणि कृष्णाचा वादविवाद होतो. त्याच्याप्रमाणें तूं आतल्या गांठीची असतीस, तर तुम्हां दोघांत कलहाचं कारणच राहिलं नसतं.

**सत्य:**—मी फटफळ तोंडाची म्हणूनच महिन्यानी कां होईना एक वेळ तरी दर्शन होतं, नाही तर वर्षानुवर्षं दृष्टीभेट देखील झाली नसती.

**नारद:**—खरं पाहिलं तर कृष्णानें तुझ्याशीं तरी प्रेमळपणानें वागलं पाहिजे. कांहीं झालं तरी तूं त्याची पट्टराणी; तुझ्यापुढं सगळ्यांनीं नम्रतेनें वागलं पाहिजे.

**सत्य:**—पण आंतून त्यांना त्याची फ़ूस आहे ना? मला कोण विचारतो! महालांत आलेच, तर कोणतं तरी कलहाचं कारण काढून रागानें निघून जायचं.

तेव्हां साहजीकच माझ्या मनाला वाईट वाटतं आणि म्हणूनच मी त्याच्या रोषाला अगर तोषाला तेवढीच किंमत देतें.

**नारद**:—भामे, तुझ्यासारख्या सरळ मनाच्या स्त्रीशीं, त्याचं दुटप्पी वर्तन मला तरी आवडत नाही.

**सत्य**:—सगळ्यांची मनं कांहीं सारखीं असतात? तुम्हांला माझ्याबद्दल वाईट वाटतं, पण त्यांना वाटतं का आणि कशाला वाटेल? आहेत ना एकीहून एक सुंदर सोळा सहस्र अष्टनायिका!

**नारद**:—मी तरी त्यांना सुंदर म्हणणार नाही. जांबुवंतीसारखी अस्वलीण देखील त्याला सुंदर वाटली, मग सुंदरपणाची व्याख्याच बदलावी लागणार. काय तें जांबुवंतीचें सांग!

**सत्य**:—म्हणजे तुम्ही गेला होतां कीं काय तिच्याकडे?

**नारद**:—कृष्णाला शोधायला म्हणून तिच्याकडे गेलों होतों. तिचें तें रूप पाहतांच जागच्या जागीं हिमासारखा थिजलों. मला प्रथम वाटलं कीं ती दासी बिसी असेल म्हणून. जेव्हा तिनेंच सांगितलं आपलं नांव, तेव्हा तर मी तिच्याकडे क्षणभर पहातच उभा राहिलों. पण आदरसत्कार कसा करावा, हें तिच्या गावी देखील नाही. रानवटपणा मात्र तिच्या अंगीं पुरेपूर भरला आहे.

**सत्य**:—पण तिच्यावर तर त्याचं अलोट प्रेम!

**नारद**:—तिच्यावर प्रेम करणारा कृष्ण नसता, तर मी त्याला आंधळा म्हटलं असतं. असल्या रानटी प्रेमाला, तो भुलला तरी कसा याचंच मला नवल वाटतं.

**सत्य**:—नवल कसलं त्यांत? नवी नवरी नवलाईची म्हणूनच तिचे नाचरंग चालले आहेत. चला आंत. असं दारावरच तुम्हांला किती वेळ तिष्ठत ठेवणार?

**नारद**:—पण तुझ्या महालांत कृष्ण नाहीं हें खरं ना?

**सत्य**:—मी बाहेर येतांना तरी ते आंत नव्हते.

**नारद**:—मी तर तुझ्या दारावर देणेकऱ्यासारखा धरणं देऊन बसलों आहे. तुझ्या महालाला दोन दरवाजे तर नाहीत ना ?

**सत्य**:—नाही हो. एकच दरवाजा.

**नारद**:—मग तो आंत जाणं शक्य नाही.

**सत्य**:—त्यांच्या बाबतींत तरी शक्य अशक्य हे शब्दच बोलूं नका. नारदमुनी, त्यांचा स्वभाव मलादेखील आवडत नाही. पण काय करणार ? "पदरी पडलं नी पवित्र झालं" म्हणून उगी रहावं लागतं. वारा येईल तशी पाठ देण्यांत त्यांचा हातखंडा. मी जर रागावलेंच तर माझी विनवणी करतील, पायसुद्धा धरतील. कुणी जर पाहिलं तर त्यांना वाटेल कीं बायकोच्या मुठीत आहेत म्हणून. हें सारं वरवरचं. सगळा ओढा रुक्मिणीकडे. माझं हितगुज मी कुणाला सांगणार ? तुमच्याबद्दल आपलेपणा वाटतो म्हणून हृदय उघडं केलं. चला, आंत चला, त्यांच्या कृत्याचा सगळा पाढा वाचतें तुमच्यासमोर. मग तुम्हीच न्याय निवाडा करा या गोष्टींचा. ( जाऊं लागतात तितक्यांत कृष्ण येतो ).

**कृष्ण**:—नारदा, सत्यभामेच्या हातून तुझं स्वागत व्यवस्थित रितीनें होणार नाही म्हणून मी स्वागत करायला बाहेर आलों.

**नारद**:—कोण, श्रीकृष्ण ?

**सत्य**:—नारदमुनी, आला अनुभव आपल्याला ? मी कधींही खोटं बोलणार नाहीं. एके ठिकाणीं याचा पाय ठरेल तर शपथ.

**कृष्ण**:—भामा, तुझा शब्द खोटा होऊं नये म्हणून मी या ठिकाणी आलों.

**नारद**:—कृष्णा, तूं कुठून आलास आतां !

**कृष्ण**:—भामेच्या महालांतून.

**नारद**:—तिनेंच सांगितलं मला तूं आंत नाहींस म्हणून ?

**कृष्ण**:—तेंही खरं.

**नारदः**—मग आंत कुठल्या दरवाज्यानें गेलास ?

**कृष्णः**—याच तुमच्यासमोरून.

**नारदः**—मग आम्हांला कसा दिसला नाहींस आणि ही कोण तुझ्याबरोबर जांबुवंती ?

**कृष्णः**—भामेला भेटणार म्हणून जाबुवंतीनें हट्टच धरला, म्हणून तिलाही बरोबर आणली.

**नारदः**—कशाला ! सवती सवतींत समेट करायला कीं काय ?

**सत्यः**—आम्ही केव्हा भांडलों होतों समेट करायला ?

**जांबुः**—तें नारदमुनींनाच विचारा.

**नारदः**—माझा काय संबंध सवती सवतींत ?

**कृष्णः**—कलागत लावण्यापुरता तरी संबंध आहे ना ?

**नारदः**—छान ! कृष्णा, तूं देखील त्याचीच बाजू घेतोस ?

**जांबुः**—नारदमुनी, तुम्हीच नाही का त्या दिवशीं मला सांगितलं कीं सत्यभामाबाई माझ्याबद्दल सवती मत्सर बाळगतात म्हणून ?

**सत्यः**—कोण मी आणि तुमच्याबद्दल ?

**जांबुः**—तें यानाच विचारा.

**सत्यः**—कांहो, नारदमुनी खरं का हें !

**नारदः**—खरं आणि खोटं यांत चार बोटाचं अंतर असतं. पण तेवढं अंतर देखील न ठेवता तुम्हीं एकमेकींना चिकटून उभ्या राहिलात. मग माझं बोलणं तुला खरं कसं वाटणार ?

**जांबुः**—म्हणजे मी खोटं बोलतें की काय ?

**कृष्णः**—नारदा, दे की उत्तर !

**नारदः**—मलाच निरुत्तर केलंत तुम्ही दोघांनीं.

**कृष्णः**—सवती सवती क्षणात भांडतील आणि दुसऱ्या क्षणात एक होतील. पण त्यांत तिसरा ढवळाढवळ करूं लागला कीं तो मात्र तोंडघशी पडतो, तशी झाली आहे नारदाची स्थिती.

**जांबुः**—सत्यभामाबाई, यांनींच तुमच्याविषयीं माझं मन कलुषित केलं.

**सत्यः**—आणि आपला संसार थाटण्याचा प्रयत्न केला.

**नारदः**—हें तुला कसं कळलं !

**सत्यः**—कसं का कळेना, पण खरं ना ?

**कृष्णः**—नाही म्हणायला तोंड आहे कुठं नारदाला ?

**जांबुः**—साक्षीदार आहे ना जवळ ?

**कृष्णः**—तिथेंही संसार थाटण्याची निराशा झाल्यामुळं, शेवट सत्यभामेचं घर गाठलं.

**सत्यः**—कशाला ?

**कृष्णः**—संसार थाटायला.

**सत्यः**—माझ्या घरात आणि हें शक्य तरी आहे कां ?

**कृष्णः**—संसाराच्या वेडानं वेडावलेल्या मनाला, शक्याशक्यतेचा विचार शिवतच नसतो.

**सत्यः**—मग विचाराचे वळसे देऊन, वेड्या मनाला ताळ्यावर आणायला नको कां ?

**कृष्णः**—तोच विचार मी मघापासून करतों आहे.

**नारदः**—कसला विचार ?

**कृष्णः**—तुझ्या संसाराचा. कृष्णकांता किती चतुर असतात, हें तुझ्या अनुभवाला आलेंच आहे. एकवेळ तुला क्षणभर कुणालाही चकवितां येईल, पण सुतानें स्वर्ग गांठणाऱ्या सत्यभामेला फसविणं म्हणजे स्वताची फसवणूक करून घेण्यासारखी आहे.

[ दुर्गा–एका ]

**चतुराया हरिजाया, निजकामा साधाया ॥ धृ० ॥**
**अंतर भावना कुणा ॥ देती न परि या निपुणा ॥**
**फसविती भेदभाव घ्यावयास मधु बोलें या ॥ १ ॥**

**नारदः**—कृष्णा, तुला विनोद सुचतो, पण माझ्या मनाला काय होतं, हें मलाच कळत नाही.

**कृष्णः**—म्हणून तुझं मनच तुला फसवितं. नारदा, तुला संसार थाटायचा असेल, तर असा आडमार्ग स्वीकारूं नकोस. परस्त्रीचा अभिलाषच तुझ्या संसाराच्या आड येतो आहे. तुला संसारी होण्याची इच्छा झाली, मोहानें दृष्टी आंधळी बनली आणि पाप पुण्याची भीती नाहीशी झाली.

**नारदः**—मग श्रीकृष्णा, कोणत्या मार्गानें मला संसार थाटता येईल ?

**कृष्णः**—मी तुझ्यासाठी सुंदर वधू पाहिली आहे आणि तिच्याशी तुझं लग्न झालं तर तुझा संसार सुखाचा होईल.

**नारदः**—खरें कां हें ? कां मला फिरून तोंडघशी पाडणार ? पण नाव काय तिचं ?

**कृष्णः**—तिचं नांव वैजयंती. आता तरी खात्री झाली ?

**सत्यः**—वैजयंती ?

**कृष्णः**—कां तुलाही संशय येतो ?

**सत्यः**—संशय नाही पण—

**कृष्णः**—हा पणच संशयाला कारणीभूत होतो. ( कानांत सांगतो ) भामा, आतां तरी तुझी खात्री खाली ?

**सत्यः**—नारदमुनीसाठीं तुम्हीं एवढं साहस करणार ?

**कृष्णः**—साहसच काय पण प्राणदेखील द्यायला माझी तयारी आहे.

**सत्यः**—तुम्ही द्याल पण आम्हां सोळा सहस्त्र अष्टनायिकेचा हक्क आहे ना त्याच्यावर ?

**कृष्ण:**—म्हणूनच मी माझ्यावर प्राणसंकट आलं असलं, तरी संकटाशीं तोंड देऊन प्राण वांचवितों. इतकं तुमच्यासाठीं करूनही, तुमचा बोल असतोच माझ्यावर कीं तुम्हीं आमच्यासाठीं काय करतां म्हणून.

**सत्य:**—नारदमुनी, यांनीं जी वैजयंती शोधून काढली आहे, तिच्या-सारखी संसारदक्ष वधू मिळायला पूर्वपुण्याई लागते.

[ मिश्र—पहाडी—केरवा ]

**कुसुमासम मृदु तनु नवबाला ॥ बघुनीया सुरजाया सुरूपाला, दिपुनि जाति त्या डोळा ॥ ध्रु० ॥ साज साजिरा संसाराला ॥ गमत रमा—सदनाला ॥ १ ॥**

**कृष्ण:**—नारदाची पूर्वपुण्याई प्रबल म्हणूनच वैजयंतीसारखी बायको लाभत आहे संसाराला. वेळ गमावून उपयोगी नाहीं. आतांच उरकून टाकूं गांधर्व विवाह. भामा आणि जाम्बुवंती आहेतच बरोबर. "शुभ—मंगल" म्हणायला. ( जातात )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ:**—पेंद्याचें घर. ( पेंद्या समाधी लावून बसला आहे असा पडदा उघडतो ).

**मंथरा:**—काय करावं आतां यांच्या समाधीला ? सन्याशाची समाधी जगाला जाचक होत नाहीं, पण यांच्या समाधीची आधी दिवसेंदिवस वाढत गेल्यामुळं उपोषणांची पाळी आहे पोरांवर. खरंच का हे समाधिस्त झाले आहेत कां समाधींचं सोंग आणले आहे ? खरोखरच समाधी लागली असली आणि एखादे दिवशीं यांनीं अरण्याची वाट धरली, तर पोरांची काय वाट ? ( विचार करून ) हो, असंच करावं, म्हणजे खरं तें बाहेर पडेल. अगआई, साप, साप, सापापासून मला वांचवा, धांवा हो धांवा !

**पेंद्या:**—काय साप ! कुठं आहे साप ! घाबरूं नकोस, मी घेतों त्याचा समाचार.

**मंथरा**:—तो पहा-तो पहा-दाराच्या फटीतून टवकारून पहातो आहे.

**पेंद्या**:—भित्री कुठली! तिथंच समाप्ती करतों त्याची. कुठं आहे माझी कुदळ, लवकर घेऊन ये.

**मंथरा**:—उठवत नाहीं हो माझ्यानं. जवळ जाऊं नका. अंगावर येईल तुमच्या!

**पेंद्या**:—प्रसंगाला तोंड दिलंच पाहिजे. (कुदळ घेऊन साप मारायला जातो, सापाऐवजीं दोरखंड हातीं लागतं) मंथरे, पाहिलंस काय तें माझ्या हातांत? या दोरखंडाला साप म्हणून तूं आकाश पाताळ एक केलंस, आणि माझ्या समाधीचा भंग केलास, म्हणूनच साधू लोक घराचा संन्यास घेऊन अरण्यांत समाधी लावून बसतात. नाहींतर असली भलतीच उपाधी पाठीमागं लागते.

**मंथरा**:—खरंच कां दोरखंड? मला वाटलं साप म्हणून जिवाच्या आशेनं आरडा ओरड केली, त्यामुळं तुमच्या समाधीचा भंग होईल हें मला काय माहीत?

**पेंद्या**:—मी घर सोडून गेल्यावर माहिती होईल.

**मंथरा**:—मी गांवढळ गवळण, एवढा कुठं पोंच आहे मला? मला सांगायचं ना समाधी म्हणजे काय ती?

**पेंद्या**:—एवढंदेखील तुला समजूं नये? अग, समाधी म्हणजे मनाची एकाग्रता करून आत्म्याशीं एकरूप होणं.

**मंथरा**:—काय हो, आत्म्याशीं एकरूप झाल्यावर, बाह्य जगाचा विसर पडतोना मनाला!

**पेंद्या**:—पूर्ण समाधी लागल्यावर.

**मंथरा**:—मग तुम्हांला माझी आरडा ओरड कशी ऐकूं आली?

**पेंद्या**:—ही समाधीची पहिली पायरी आहे म्हणून.

**मंथरा**:—मग शेवटची पायरी केव्हां असते?

**पेंद्या**:—संसाराचा संन्यास घेतल्यावर.

**मंथरा**:—मग हें समाधीचं सोंग म्हणायचं !

**पेंद्या**:—मंथरे, तुला माझं प्रत्येक करणं खोटंच वाटतं. ज्या दिवशी खरोखरच संन्यास घेईन, त्या दिवशीं तुझे डोळे उघडतील ?

**मंथरा**:—आतां कुठं डोळे झांकले आहेत मग डोळे उघडायला ?

**पेंद्या**:—म्हणजे तूं समजून उमजून माझ्यावर खोटा आरोप करतेस.

**मंथरा**:—खोटा आरोप कसा करीन ? खरं तेंच मी बोलतें. तुम्हांला मात्र तें पटत नाहीं.

**पेंद्या**:—पटेल कसं पुरा-यानिशीं खोटं माप पदरीं घातल्याशिवाय ?

**मंथरा**:—मग हें संन्याशाचें वेड डोक्यांतून काढून टाकाल ?

**पेंद्या**:—हो, हो, पण मला पटलं पाहिजे.

**मंथरा**:—बोला, हा संसार माझ्या एकटीचा का दोघांचा ?

**पेंद्या**:—दोघांचा.

**मंथरा**:—मग संसाराकडे डोळेझांक करून संन्याशाच्या मागें का लागतां ?

**पेंद्या**:—संसाराचा कंटाळा आला म्हणून !

**मंथरा**:—कंटाळा कां आला संसाराचा ?

**पेंद्या**:—तुझ्या तोंडाळपणामुळं.

**मंथरा**:—माझा तोंडाळपणा ? मला काय वेड लागलं आहे वाटतं ?

**पेंद्या**:—तसं झालं असतं तर तुझ्यावर रागावण्याऐवजीं मी तुझी किंवच केली असती.

**मंथरा**:—मला वेड लागल्यानं तुमचा संसार सुखाचा होईल कां !

**पेंद्या**:—त्यामुळं माझ्या सन्याशाच्या आड कुणी येणार नाही.

**मंथरा**:—मग पोरांची काय वाट ?

**पेंद्या**:—जगाच्या पाठीवर कुठेंही राहिलीं असतीं—

**मंथरा**:—आणि तुम्ही सन्याशी झाला असतां असंच ना ?

**पेंद्या**:—त्यांत काय संशय ?

**मंथरा**:—कशाला मग संसारांत पडलांत ?

**पेंद्या**:—तोच मूर्खपणा आज माझ्या संन्याशाच्या आड येतो आहे. मंथरे, गृहस्थाश्रमाचे नियम पाळूनच, मी वानप्रस्ताश्रय स्वीकारीत आहे, तें तुला कसं कळणार ?

**मंथरा**:—जगावेगळाच आपण संसार केला आहे ना मला न कळायला ?

**पेंद्या**:—मंथरे, आपला जगावेगळा संसार नसला तरी जगावेगळं राहून, जगाच्या कल्याणासाठीं योजलेला मार्ग मात्र जगावेगळा आहे.

**मंथरा**:—स्वताच्या बायकांपोरांचं ज्यांना कल्याण करता येत नाही, त्यांच्या हातून जगाचं कल्याण किती होईल, हें दिसतंच नाहीं कां ?

**पेंद्या**:—इथेंच तूं चुकतेस. हिच घोडचूक तुझ्या हातून पुन्हां होऊं नये म्हणून तुला गृहस्थाश्रमाचे नियम पढवून ठेवतों; म्हणजे तूं यापुढें तरी माझ्यामागं माझ्या नांवानें खडे फोडणार नाहींस. अग, आपलं शास्त्र काय सांगतं ! पत्नी मातृपदारूढ झाल्यावर पतीचं कर्तव्य संपलं. त्यापूर्वी मात्र पतीनें गृह–संन्यास घेतां कामा नये. तसं पाहिलं तर तें कर्तव्य माझ्या हातून पूर्णपणें पार पडलं आहे. स्त्रीला मूल झाल्यावर तिचं पतीवरचं प्रेम ओसरूं लागतं आणि मुलांभोंवतींच ती आपला जीव खेळवीत असते. भरल्या घरांत त्याचीही तुला उणीव नाहीं.

**मंथरा**:—तेवढं सुखदेखील तुमच्यानं पहावत नाहीं वाटतं ?

**पेंद्या**:—त्यामुळंच तुझ्या माझ्यांत तंटाबखेडा उत्पन्न होतो आणि मी सन्यास घ्यायला तयार झालों आहे. मंथरे, मी इथून गेल्यावर कांहीं महिने, कांहीं दिवस, तुला मला चुकल्या चुकल्यासारखं वाटेल. पण पोरांबाळांच्या सहवासांत, तूं मला कायमची विसरून जाशील.

**मंथरा**:—तें तत्वज्ञान नको सांगायला मला. तुम्हीं मात्र आतांच विसरून जायला तयार झालांत.




**पेंद्याः**—कुंभरच्च पडला होता कीं नाहीं तुझा बाप.

**पेंद्या**:—तेवढी तुझ्या मनाची तयारी करण्यासाठींच, मी संसारी सन्यास घेतला होता.

**मंथरा**:—त्याची नको तुम्हांला काळजी. मी खंबीर आहे मनाची. तुमचा हा संसारी सन्यासच, माझ्या संसार सुखाच्या आड येतो आहे. तुम्हांला सन्यासच घ्यायचा असेल, तर खोळंबून ठेवलं आहे कुणी घरांत? आयतं गिळायला मिळण्यासाठीं, हीं सोंगं ढोंगं मला पूर्ण समजतात बरं! केव्हां घेतां सन्यास?

**पेंद्या**:—म्हणजे माझा कंटाळा आला आहे कां तुला?

**मंथरा**:—तुम्हांलाच संसाराचा कंटाळा आला आहे. तेव्हां उगीच कशाला तिष्ठत ठेऊं तुम्हांला माझ्यासाठीं? जगाच्या कल्याणा आड मी कशी येऊं?

**पेंद्या**:—मंथरे, तुला अजून माझा सन्यास म्हणजे सोंगच वाटतं. मी एकदां तुझ्या दृष्टीआड झालों, म्हणजे तुला तुझ्या अदूरदृष्टीबद्दल वाईटच वाटेल.

**मंथरा**:—वाईट का वाटेल? उलट मला अभिमानच वाटेल तुमच्या सत्कार्याबद्दल. असे चालत्या संसारावर लाथ मारणारे सन्याशी, जगाच्या पाठीवर मिळणंच विरळा!

**पेंद्या**:—पहा बरं? एकदां घराबाहेर पाय पडल्यावर, फिरून पाय घराला लागणार नाहींत, म्हणून माझा जीव घुटमळतो आहे घरांत.

**मंथरा**:—कांहीं नको घुटमळायला. मनाची तयारी झाल्यावर घुटमळतां कां सन्यास घ्यायला? तुमचं कोवळं मन, तेव्हां तुमच्या हातून तयारी व्हायची नाहीं सन्याशाची. मी तुमची बायको, यावेळीं तरी तुम्हांला हातभार लावायला नको कां? थांबा अं! मीच करतें तुमच्या सन्याशाची तयारी. (आंत जाऊन सन्याशाचा पोशाख आणते)

**पेंद्या**:—म्हणजे तूं आधींच तयारी करून ठेवली होतीस वाटतं माझ्या सन्याशाची?

**मंथरा:**—वेळेवर तुम्हांला पोशाख सांपडणार नाहीं, म्हणून मी तयारी केली होती.

**पेंद्या:**—आण तो इकडं. ( पोशाख अंगावर घालतो ) मंथरे, आतां पहा मी कसा दिसतों तें ! काय या पोशाखाचा चमत्कार सांगूं ? अंगावर चढविल्या-बरोबर, देहाची आशा सुटते आणि संसाराची माया तुटते.

**मंथरा:**—मग उभे कां अजून इथंच ?

**पेंद्या:**—मी जातोंच पण—

**मंथरा:**—पण काय ?

**पेंद्या:**—तुझी अजून पोरबुद्धी आहे. तऱ्हां दोन हिताच्या गोष्टी सांगण्या म्हणून मी थांबलों.

**मंथरा:**—काही नको थांबायला. देहाची आशा सुटली आणि संसाराची माया तुटली मग कशाला उगीच संसारांत मन घालतां ? नाहीं तर पुन्हां मोह पडायचा संसाराचा !

**पेंद्या:**—तें तर आतां शक्य नाहीं. पण जिवाभावाचे बोल सांगितल्या-शिवाय भाव–बंधन तुटत नाहीं.

**मंथरा:**—भाव–मंथन झाल्यावर, जिवाभावाचे बोल कुठले आठवायला ? शिवाय सन्याशाला कुठलं भाव–बंधन ?

**पेंद्या:**—घरांत असेपर्यंत तरी बायको–पोराचं भाव–बंधन सुटत नाहीं. म्हणून सांगतों, मंथरे, माझ्या पश्चात्त मुलबाळांची चांगली जोपासना कर; मारूं बिरूं नकोस त्यांना !

**मंथरा:**—त्यांची नको तुम्हांला काळजी.

**पेंद्या:**—तुला त्यांची काळजी असणारच. आईचं हृदय तें, नको म्हटलं म्हणून राहतं थोडंच. मला राहवत नाहीं म्हणून सांगितलं.

**मंथरा:**—तें कळलं मला. आणखी काय राहिलं सांगायचं ?

**पेंद्या:**—सांगून टाकतों एकदांचं. संसाराचा पाश तोडतांना, मनाचं सारं हितगूज बायकोला सांगावं लागतं.

**मंथरा**:—तें समजलं मला.

**पेंद्या**:—तशी तूं शहाणी आहेस ग, म्हणूनच मी संसाराचा भार तुझ्यावर टाकून, सन्यास घ्यायला तयार झालों आहे. तूं स्त्री आहेस, चुकभूल होणं साहजीक आहे. गुरांढोऱ्हांना वेळेवर चारापाणी घाल, म्हणजे मुलांना दुधदुपतं भरपूर मिळेल.

**मंथरा**:—त्याचीही व्यवस्था मी करीन. संसाराचा सारा भार अंगावर घेतल्यावर मला नको कां व्यवस्था करायला? त्याबद्दल बिलकूल काळजी करूं नका. मग तर झालं? आतां खुशाल चला.

**पेंद्या**:—आतां शेवटचं सांगतों. कधीं काळीं मी तुला रागें भरलों असेन कदाचित तुझ्या मुलाबाळांकडे दुर्लक्ष केलं असेन, तर तें तूं मनावर घेऊं नकोस आणि माझ्यामागें त्यांना माझी आठवण होऊं देऊं नकोस एवढं सदैव लक्षांत ठेव म्हणजे झालं. ( पेंद्या मंथरेकडे पहात जातो )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**—रस्ता. **पात्रें**—( नारद, पेंद्या आणि कृष्ण )

**नारद**:—शेवटीं कृष्णाच्या मध्यस्थीनें संसारी झालों. वैजयंतीसारख्या सुस्वरूप पत्नीचा लाभ झाला. संसार सुखाचा वाटला. कांहीं वर्षे आनंदांत गेलीं पण मुलांबाळांचा परिवार वाढल्यापासून दुःखाला सुरवात झाली. वैजयंतीच्या अंगाखांदावरच्या अलंकारावर, एवढा काळ मुलांबाळांचं पालनपोषण झालं. हातपाय हालविल्याशिवाय जेवणाखाण्याचे हाल चुकवितां येणार नाहींत म्हणून स्वताच्या कर्तबगारीवर कांहीं मिळविण्यासाठीं घराबाहेर पडलों. या द्वारकेंत तरी हाताला यश मिळण्याची आशा नाहीं. एवढीं ओळखीचीं माणसं भेटलीं, पण माझ्या गरिबीच्या संसाराला हातभार लावण्याऐवजीं, उलट संसारी झाल्याबद्दल मलाच दूषणं देऊं लागलीं. पडत्या काळीं कुणी कुणाला विचारीत नाहीं, याचा अनुभव आज मला आला. रिकाम्या हातानें घरीं जावं म्हटलं, तर मुलांबाळांचे भुकेनें व्याकूळ झालेले दीन चेहरे डोळ्यासमोर दिसतात. ( इतक्यांत पेंद्या येतो ) कोण पेंद्या?

**पेंद्या**:— कोण नारदमुनी ! नमस्कार घ्या या सन्याशाचा.

**नारद**:—कल्याणमस्तु ! वा: ! पेंद्या, एकूण तूं संन्याशी झालास ?

**पेंद्या**:—होय; आपल्याच कृपेनं संन्याशी झालों.

**नारद**:—इतक्या भर मध्यान्हेला चाललास कुठं ?

**पेंद्या**:—श्रीकृष्णाला भेटायला.

**नारद**:—एका ठिकाणीं असेल तर ना तो तुला भेटणार ?

**पेंद्या**:—त्याचें ठिकाण मला माहीत आहे आणि त्या ठिकाणी नाहींच सापडला तर या पेंद्याला कुठंही जायला मज्जाव नाहीं.

**नारद**:—अनेक नायिकेंचा तो नायक. सगळ्या नायिकेंचीं ठिकाणं धुंडाळल्याशिवाय त्याचा ठावठिकाणा लागणं शक्य नाहीं, आणि इतक्या नायिकेचीं ठिकाणं धुंडाळायला पृथ्वी-प्रदक्षिणेचा काळ लागेल.

**पेंद्या**:—पण त्याची भेट घेतल्याशिवाय मला द्वारका सोडतां येत नाहीं.

**नारद**:—म्हणजे द्वारका सोडून कुठं चाललास आज ?

**पेंद्या**—निर्जन अरण्यांत.

**नारद**:—कशाला ?

**पेंद्या**:—परब्रह्मस्वरूपाचं दर्शन घ्यायला.

**नारद**:—एवढी तुझ्या मनाची तयारी झाली तर ?

**पेंद्या**:—होय. आपल्या मंत्राचा प्रभावच तसा आहे. एवढा काळ संसारीं संन्यास घेऊन घरींच समाधी लावण्याचे प्रयत्न केले, त्याला यश आलं म्हणूनच गृहसंन्यास घेतला.

**नारद**:—पण तुझ्या बायकोची परवानगी मिळाली कां तुला सन्यास घ्यायला ?

**पेंद्या**:—तिनेंच तर माझ्या संन्याशाची तयारी केली.

**नारद**:—मग सूर्य पश्चिमेला उगवला म्हणायचा.

**पेंद्या**:—म्हणजे ?

**नारद**:—पेंद्या, तुझी भेट घेण्याकरितां एकदा मी तुझ्या घरीं आलों होतों. दाराच्या तोंडी तुझी बायको उभी होती, तिच्या तोंडी सांपडलों. तुझी भेट तर झाली नाहींच, पण मला घटकाभरदेखील तिथं उभं राहूं दिलं नाही. ताकाचा घुसळखांब घेऊन माझ्या पाठीमागं लागली. मला तिच्या हातचा प्रसाद चुकविण्यासाठीं पलायन करावं लागलं.

**पेंद्या**:—मला का हाक मारली नाहींत ?

**नारद**:—मला जिथं बोलूच देईना, तिथं हांक कुठून मारणार ? उलट तिनेंच मला शह दिला कीं यापुढें तुम्ही इथं याल, तर तुमच्या चिपळ्या घणिचा प्रयोग तुमच्यावरच केला जाईल म्हणून.

**पेंद्या**:—नारदमुनी, एका घटकेच्या सहवासांत तुम्हांला तिचा कंटाळा आला. मी माझं अर्धं आयुष्य तिच्या सहवासात कसं घालविलं असेल, याची कल्पना करा म्हणजे झालं. पण माझ्या संन्याशाआड मात्र ती आली नाहीं. कारण तिला माझा संन्यास म्हणजे सोंग असं वाटत आहे, हें माझ्या पथ्यावरच पडलं. कांहीं झालं तरी संसाराचा पाश तोडतांना थोडी मनाची चलबिचल झाली, पण तिला मात्र दर्शविली नाहीं. केला मनाचा निर्धार आणि सोडलं पाणी घरादारावर. कृष्णाला भेटण्यासाठीं निघालों होतों, तर अनायासें तुम्ही भेटलांत. नारदमुनी, आपला संसार कसा चालला आहे ?

**नारद**:—संसार !

**पेंद्या**:—कां निराशेचे निश्वास सोडतासे ?

**नारद**:—माझ्या वाट्याला निराशा आली म्हणून.

**पेंद्या**:—संसाराच्या सुरवातीलाच निराशा !

**नारद**:—पेंद्या, संसाराची सुरवात सुखात झाली आणि पोरांच्या जन्मा-बरोबर निराशा जन्माला आली. आशा निराशेच्या झगड्यांत निराशेचाच जय झाला. संसारात सुख नाहीं. हेंच अनुभवाला आलं. श्रीमंतांचा संसार सुखाचा असेल, पण गरिबाच्या संसारात तरी सुख नाहीं हेंच खरं.

**पेंद्या**:—हेंच मी तुम्हाला सागत होतों. पण तुम्हांला माझा उपदेश पटला नाहीं म्हणून तुम्ही सुखाचा जीव दुःखांत घातलात.

**नारदः**—आतां कळून काय उपयोग ? पेंद्या, दोन पोटांचा प्रश्न असता, तर मी इतका निराश झालों नसतों. पण माझ्या संसाराचा परिवार अवाढव्य वाढल्यामुळं मी मेटाकुटीला आलों आहे.

**पेंद्याः**—पण तुम्ही कृष्णाला कां भेटलां नाहींत ?

**नारदः**—कुठल्या तोंडानें जाऊं श्रीकृष्णाकडे ? संसारांत सुख नाहीं म्हणून त्यानें तुझ्याप्रमाणंच परोपरीनं मला सांगितलं असता देखील, त्याच्याच मध्यस्थीनें मी संसार थाटला. आतां मला संसाराचा वाढता परिवार सांभाळतां येत नाहीं म्हणून त्याच्याजवळ मदत कशी मागूं ?

**पेंद्याः**—गरजवंताला अक्कल नाहीं. प्रथम तुम्हीं संसारी व्हायला नको होतं, पण झालांत. मग विनाकारण स्वाभिमानाला बळी पडून, मुलांबाळांचे हाल उघड्या डोळ्यांनीं पाहणार ?

**नारदः**—नाहीं. पेंद्या, मी कृष्णाजवळ मदतीची याचना करणार नाहीं.

**पेंद्याः**—नारदमुनी, तुमची केविलवाणी स्थिती पाहून, मला तुमची किंव येते. मी आतां संन्याशी झालों आहे. सहानुभूतीच्या शब्द–भांडारा पलीकडे, संन्याशाजवळ काय असणार ? नाहीं तर मी आपल्या संसाराला थोडा तरी हातभार लावला असता.

**नारदः**—पेंद्या, सहानुभूतीच्या शब्दानं तरी माझ्या संसाराबद्दल आपले-पणा दाखविणारा, या द्वारकेंत तूं पहिलाच भेटलास. त्यांतच मला आनंद झाला. तूं आज संन्याशी झाला आहेस. परब्रह्मस्वरूप गाठण्याचं ध्येय दृष्टीपुढें ठेवलं आहेस. पण तें ध्येय गांठण्याच्या मार्गांत, अनेक संकटाचे पर्वत उभे राहतील. ते ओलांडतांना देहाची आशा सोडली पाहिजे, तरच तुला आपला अंतीम हेतू साध्य होईल हें पूर्ण लक्षांत ठेव. मन द्विधा होऊं देऊं नकोस. तुझे मनोरथ पूर्ण होवोत, असा माझा तुला आशीर्वाद आहे. ( जातो ).

**पेंद्याः**—अरेरे ! तिन्हीं लोकीं स्वयंप्रेरणेनं संचार करणाऱ्या नारदाच्या नशिबीं संसाराची हालअपेष्टा यावी, याहून दैव–दुर्विलास तो कोणता ?

**कृष्णः**—( प्रवेश करून ) पेंद्या, कुणाशीं बोलत होतास इतका वेळ ? पाठमोरा होता म्हणून त्याचा चेहरा मला दिसला नाहीं.

**पेंद्याः**—नारदाशीं बोलत होतों मी.

**कृष्ण**:—कशाला आला होता इकडे आणि काय सांगत होता तुला ?

**पेंद्या**:—आपल्या संसाराची दैना. त्याची केविलवाणी स्थिती पाहून मलादेखील वाईट वाटलं.

**कृष्ण**:—आपण होऊन ओढवून आणलेल्या आपत्तींचा वाटेकरी दुसरा कोण होणार ?

**पेंद्या**:—कृष्णा, तुला तरी हें बोलणं शोभत नाहीं. तुला, अनाथांचा नाथ, दीनांचा कैवारी म्हणतात. मग त्याचं दैन्य पाहून तुझं हृदय कळवळलं पाहिजे होतं, उलट तूं त्यांचा उपहास करतोस !

**कृष्ण**:—पेंद्या, नारदाच्या दैन्याला नारदच कारणीभूत आहे. बाल-ब्रह्मचाऱ्याला हा नसता संसाराचा व्याप कुणी सांगितला होता ?

**पेंद्या**:—म्हणून त्यांचा अंत पाहणं योग्य आहे कां ? तुझ्याजवळची अलोट संपत्ती माझ्याजवळ असती, तर नारदाला सुखी करायला मी मागंपुढं पाहिलं नसतं.

**कृष्ण**:—औदार्य तर तूं फारच दाखवूं लागलास ? ( त्याच्याकडे पाहून ) हो, मी तुझ्या वेशाकडे पाहिलंच नाहीं. हा कसला वेश तूं धारण केला आहेस?

**पेंद्या**:—सन्याशाचा.

**कृष्ण**:—सन्याशाचा ! पेंद्या, ही दिक्षा तुला कुणी दिली ?

**पेंद्या**:—नारदानीं.

**कृष्ण**:—छान ! स्वतः संसारी झाला आणि तुला सन्याशी बनविला.

**पेंद्या**:—नाहीं. मी होऊनच सन्याशी व्हायला तयार झालों.

**कृष्ण**:—इतका कां वैतागलास संसाराला ? पेंद्या, सन्यास म्हणजे पोरखेळ नाहीं कीं वाटेल त्यानें उठून सन्याशी व्हावं. सन्याशाचीं वस्त्रं अंगावर चढविलीं कीं सन्याशी होत नाहीं !

**पेंद्या**:—मग कशानं सन्याशी होतो ?

**कृष्ण**:—मनानें सन्याशी झाला पाहिजे. संसाराचा मोह आणि देहाची आशा सुटल्याखेरीज सन्याशी होत नाहीं.

**पेंद्या**:—कृष्णा, संसाराचा पाश तोडून आणि देहाची आशा सोडूनच, मी सन्याशाचीं वस्त्रं परिधारण केलीं आहेत.

**कृष्णः**—हा सन्यास घेऊन आतां तूं काय करणार?

**पेंद्याः**—परब्रह्मस्वरूप गांठणार.

**कृष्णः**—परब्रह्मस्वरूप? (हंसतो)

**पेंद्याः**—हंसतोस कां कृष्णा? माणसाला अशक्य आहे कां तें गांठणं?

**कृष्णः**—माणसाला अशक्य नाहीं. पण तुला तें किती शक्य आहे, या विचारानेंच मला हंसूं आलं.

**पेंद्याः**—प्रयत्नावांचून शक्य कसं होणार? प्रयत्नाअंतीं परमेश्वर.

**कृष्णः**—माणसाचा अंत पाहूनच परमेश्वर अंतीं प्रसन्न होतो. तुझ्या अंगी अजून ती पात्रता आली नाहीं. वेड्या, उगाच परब्रह्मस्वरूपाच्या मागं लागून, जिवाचे हाल करून घेऊं नकोस. जा घरीं आणि कांहीं वर्षं तरी सुखासमाधानानं संसार कर.

**पेंद्याः**—संसार! नको, कृष्णा, फिरून मला संसारात पाडूं नकोस. संसाराला मी कंटाळलों आहे. सुख आणि समाधान श्रीमंतांच्या वाट्याला येतं, गरिबाच्या नाहीं.

**कृष्णः**—चुकतोस तूं पेंद्या, श्रीमंतांपेक्षा गरिबांचा संसारच सुखाचा असतो. बाह्यांगी श्रीमंत लोक कितीही विलासी–सुखी दिसत असले तरी अंतरंगाचा पडदा दूर सारला तर गरिबाहून ते असमाधानी–दुःखीच दिसून येतील. बहुमोल वस्त्रालंकारावरून का तूं श्रीमंतींत सुख मानतोस? ही कल्पनाच चुकीची आहे. याचा तूं पूर्ण विचार केला आहेस कां?

**पेंद्याः**—मी पूर्ण विचार करूनच हा संन्यास घेतला आहे.

**कृष्णः**—ठीक आहे. तूं मनाचा निर्धार केला आहेस, मग मी तरी तुझ्या पुण्यमार्गाच्या आड कां येऊं? तूं माझा बाळसवंगडी म्हणून मला योग्य वाटलं तें सांगितलं.

**पेंद्याः**—आणि मी ही कोणती गोष्ट तुला न कळविता केली नाहीं म्हणून सांगायला आलों. पण तुझा निरोप घेण्यापूर्वी तुझ्याजवळ माझी एक विनती आहे.

**कृष्णः**—ती कसली?

**पेंद्याः**--मी संसाराचा त्याग केलाच आहे. पण माझ्यामागें माझ्या घरीं जाऊन, बायकोमुलांचा समाचार घेत जा.

**कृष्णः**—त्यांची नको तुला काळजी. उगाच बायकोमुलांच्या काळजीनें पुण्यमार्गात अडथळा आणूं नकोस. मी घेईन त्यांचा समाचार. मग तर झालं. आतां सुखरूप जा आणि स्वतःचा मोक्ष साधून घे. (पेंद्या जातो. कृष्ण त्याच्याकडे हंसत पाहतो ).

( मिश्र—कॉफी—त्रिताल )

**भाव-भला नाद-खुळा लावियला, वनिचा पथ सुखकर गमला ॥ धृ० ॥ प्रिय झाला हा मम हृदयाला ॥ रूसवा धरिला, मुकला मजला, स्नेहभाविं जिव हा भुकेला ॥ १ ॥**

( पडदा )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळः**—नारदाचें घर **पात्रें**—( नारद आणि वैजयंती )

( नारद डोक्यावर हात ठेवून विचार करीत बसला आहे. समोर वैजयंती उभी आहे. )

**वैजयंतीः**--असा डोक्यावर हात ठेवून कां पोराचं पोट भरणार आहे ? हातपाय हालवाल ते हांना हातावर पैसा दिसेल ?

**नारदः**—हातपाय हालवूनदेखील पैसा दिसत नाहीं म्हणून डोक्यावर हात ठेवून बसलों. तेवढं सुखदेखील तुझ्यानं पाहवलं नाहीं.

**वैजः**--जशी कांहीं मी तुमच्या बाईटावरच उठलें कीं नाहीं ? बोलायला कांहीं वाटतं कां तुम्हांला ? भरल्या घरांत धान्याचा एक दाणादेखील नाहीं; सोन्यासारखीं पोरं, भुके तहानेनं व्याकुळ झाल्यामुळं, तोंडचं पाणी नाहींसं झालं आहे. त्यांची आहे कां तुम्हांला काळजी ?

**नारदः**—कुणाच्या तोंडाला पानं पुसून घर धान्यानें भरून काढूं ? वैजयंती, सोन्यासारखीं पोरं झाल्यामुळंच, दृष्टीलादेखील सोनं पडत नाहीं. नाहींतर सोन्याचं घर बांधलं असतं.

**वैजः**—हो तर! कुबेरच पडलांत कीं सोन्याचं घर बांधायला?

**नारदः**—अग, कुबेराजवळ भांडार भरपूर असतं खरं, तें सांभाळायला डोळ्यांची वात करून जिवाची ज्योत जागवावी लागते. बरं इतकी जडजोखीम अंगावर घेऊन हो, त्याला त्यातील एक पैसादेखील खर्च करायला अधिकार नसतो. रखवालदारीचा वारसामात्र मिळतो. गरिबांचं जडजवाहीर म्हणजे स्त्रीचं सुंदर रूप. तें सांभाळण्याकरितां मात्र त्यांना जागता पहारा करावा लागतो.

**वैजः**—जागचे हालाल तर ना जागता पहारा करायला?

**नारदः**—पण ही "जागती-ज्योत" घरांत तेवत असल्यामुळं, मला जागता पहारा करावा लागत नाहीं. थोडक्यांत सांगूं रूपवती भार्या शत्रु!

**वैजः**—म्हणजे मी तुमची शत्रू?

**नारदः**—तसं न हे ग, सोन्याहूनही सुंदर स्त्रीला जपावं लागतं. सोन्याला चोरांची भीती, तर सुंदर स्त्रीला शत्रूंची. म्हणूनच मी तुझ्या भोंवतीं पिंगा घालींत असतों.

**वैजः**—काय पण मला जपतां? मला मात्र तुमच्यासाठीं खपावं लागतं. अहाहा, दिवे ओंवाळावे मुखावरून!

**नारदः**—तो दिवस वर्षांतून एकदांच येतो. तूं जर रोज दिवे ओंवाळूं लागलीस, तर त्या दिवसाच्या दिवे ओंवाळणीला महत्त्वच राहणार नाहीं. तुझ्या हौसेसाठीं त्याला देखील माझी तयारी आहे. तेवढ्यानं तुझ्या डोळ्याचं पारणं फिटेल कां? शिवाय तुझ्या आज्ञेबाहेर जाणार नाहीं, असं तुला विवाहाच्या वेळीं वचन दिलं आहे. विवाहाचं वचन मला तरी जिवाच्या जोखमीनें पाळलं पाहिजे. नाहींतर कृष्णाजवळ माझ्या विरुद्ध कागाळी न्यायाचीच.

**वैजः**—त्यांच्याजवळ कशाला नेईन मी?

**नारदः**—ते आमच्या गांधर्व विवाहाचे मध्यस्थी आहेत म्हणून. भल्या माणसानं विवाहाच्या बाबतींत तरी मध्यस्थी होऊं नये. दोघांचं भलं झालं, तर त्याला भलेपणा मिळत नाहीं. नशीब चांगलं म्हणून आपलं भलं झालं असा युक्तिवाद सुचत असतो. उलट वाईट झालं, तर त्या वाईटाला मात्र तो धनी. अशी आहे जगाची रीत. ते हां आपल्या वाढत्या संसारांत बापकमाईच्या नावानें

भोपळ्याएवढं पूज्य असल्यामुळं, सुखानें एक वेळ खायला मिळत नाहीं म्हणून तूं कृष्णाजवळ कागाळी नेलीस, तर मलाच त्याच्यापुढं मान खालीं घालावी लागणार.

**वैजः**—जसा कांहीं तुमच्याविषयीं मला अभिमानच नाहीं आणि केवळ माझ्या सुखासाठींच कीं नाहीं एवढा वेळ तुमच्या कानीं कपाळीं ओरडलें ?

**नारदः**—तुझ्या तिन्ही त्रिकाळ ओरडण्यामुळंच, डोक्यावर हात ठेऊन कपाळाचा शीण चुकवीत होतों, पण तुला तें कसं कळणार ? आतां तूंच सांग कीं मी काय केलं असतां, ही कानीं कपाळींची किटकीट कायमची चुकेल ?

**वैजः**—माझी किटकीट कां ? बरोबरच आहे. बोलणाऱ्याचं तोंड दिसतं, पण करणाऱ्याची कृती मात्र दिसत नाहीं. मीच जातें घर सोडून, म्हणजे तुमच्या मागची किटकीट चुकेल. मग बसा घरीं पोरांना सांभाळीत.

**नारदः**—मी थोडाच सोडीन तुला जायला. हातांत हात देऊन आणली आहे घरांत. आतां घर उघड्यावर टाकून तुला कसं बरं जायला मिळेल ? सत्यभामा तर तूं संसारदक्ष म्हणून तुझी स्तुती करत होती आणि आतां जर तूं संसाराकडे दुर्लक्ष करून घराबाहेर जाऊं लागलीस, तर तुलाच लोक नाव ठेवतील ! वैजयंती, असं वैतागून कसं चालेल ? दोघानीं एकमेकांना संभाळल्या-खेरीज, पोरांचा सांभाळ कसा करता येईल ?

**वैजः**—नुसत्या सांभाळण्यानं त्यांचं पोट भरेल कां ? म्हणजे "बोलाची कडी नी बोलाचा भात" असंच ना ? माध्यान्ह आली कीं डोळ्यापुढं अंधेरी येते ना ? मग त्यावेळीं काय करायचं ? सकाळीं आहे तर संध्याकाळची भ्रांती असे आजपर्यंत कसेतरी दिवस काढतें.

**नारदः**—दुःखाशिवाय सुखाला गोडी नसतं.

**वैजः**—या जन्मींतरी तुमच्या सहवासांत सुखाचं नांव घ्यायला नको. घराबाहेर पाऊल टाकाल तर ना, संध्याकाळची भ्रांती चुकणार आणि सुखाचे दिवस दिसणार ?

**नारदः**—एकदां घराबाहेर पडलेलं पाऊल, घराला धरून रहात नाहीं म्हणून लोक नांवं ठेवतात. नांवलौकिक राखून घरांत रहावं म्हटलं, तर तूं मला नांवं ठेवतेस. एकूण काय माझ्या मात्र नाकीं नऊ आले आहेत.

**वैजः**—अहाहा! काय पण उजेड पडला आहे नांवाचा! नुसतं नांव घेतलं, तर लोकांत नांवावर मिळायचं राहिलं बाजूला, उलट माझ्या नांवाला मात्र कमीपणा येतो. नवऱ्याच्या नांवावर बायको ओळखली जाते. इथं तर बायकोच्या नांवावर नवऱ्याचं नांव गाजतं.

**नारदः**—म्हणूनच तुझ्या नांवांत ढवळा ढवळ केली नाहीं. लग्नापूर्वीचंच नांव कायम ठेवलं. वैजयंती, पुरुषाचं नाव केव्हा नांवारूपाला येईल याचा नेम नसतो. "पुरुषस्य भाग्यं"! एकदां भाग्य यायला लागलं कीं घरांतदेखील मावत नसतं.

**वैजः**—म्हणून बाहेर वाहतं असंच ना? काय पण भाग्याचे पुरूप?

**नारदः**—वैजयंती, पुरुषाच्या भाग्याला हिणवूं नकोस. भाग्योदय केव्हा होईल, हें तुलाच काय, देवाच्या देवालादेखील सांगता येणार नाही.

**वैजः**—ललाटींच लिहिलं नाही, तर देवाचा देव तरी काय सांगणार?

**नारदः**—ललाट-लेख माणसाला वाचतां आला असता, तर भविष्य काळाची काळजी कुणालाही वाटली नसती. म्हणूनच देवानं चर्म चक्षुंनादेखिल दिसूं नये, म्हणून ललाटीच्या सात पडद्याआड लेख लिहून ठेवला आहे! मग तो तुला कसा कळणार?

**वैजः**—पण तुमच्या भावी भाग्योदयानें आजच्या पोटाचा प्रश्न सुटेल कां?

**नारदः**—नाहीं! हें मी कबूल करतों! म्हणूनच मी स्वताच्या कर्तब-गारीवर कांहीं मिळतं कीं काय म्हणून आजपर्यंत द्वारका उलथी पालथी घातली, पण कमाईच्या नांवानें हाती शून्य! गणीतशास्त्रांतदेखील हातीं शून्य येत नाही, पण व्यवहारात मात्र नेहमीं हातीं शून्य येतं! वैजयंती, याला तोड शोधून काढली आहे आणि ती तुला पटली कीं पोटापाण्याचा प्रश्न ताबडतोब सुटेल!

**वैजः**—कसली तोड शोधून काढलीत?




**वैजयंती**:—उठा, लागा जेवणाच्या तयारीला.

**नारद**:—थोडक्यांत सांगतों! कलीचा नारद म्हणून माझ्या नांवाचा द्वारकेंत गाजावाजा झालाच आहे! पण तुझं नाव कांहीं माझ्या नांवाएवढं, नांवारुपाला आलं नाहीं! ते हां तुला कांहीं पोटापुरतं मिळवायला त्रास पडणार नाहीं!

**वैज**:—आणि तुमच्या मागचा त्रास चुकेल असंच ना? मी जर बाहेर कामाकाजाला गेलें, तर तुमच्या नांवाला कमीपणा येणार नाहीं कां? शिवाय मुलाबाळांना कोण सांभाळणार?

**नारद**:—वैजयंती, नांवलौकीक सांभाळून, संसार करावा म्हटलं, तर पोट पाठीला लागलं आहे ना? आपल्या दोन पोटांचा प्रश्न असता, तर इतकी मी काळजी बाळगळी नसती! पण पोटाची मोजदाद, हातापायांच्या बोटांनीं देखील होणार नाहीं, इतक्या पोटांची व्यवस्था नांव साभाळून करतां येईल कां? अग गरिबांच्या संसाराचा परिवार अपरिमित वाढला कीं नांवाची वाढ खुंटली जाते आणि जगण्यापुरतं मिळवायला देखील अडचण पडते! तेव्हां जगात जगण्यापुरतं मिळविण्यासाठीं, नांवाचा मोठेपणा कसा मिरवितां येईल! आजपासून घरातील तुझी सारी कामें मी पत्करतों! हो, थोडे दिवस, पोरांना सांभाळायला त्रास पडेल, पण त्यानं पोटापाण्याचा त्रास चुकेल!

**वैज**:—बोलणं सोपं असतं; पण करणी करतांना कठीण होतं! नाहीं तर मी जायची बाहेर कामाकाजाला आणि घरांत सुरवात व्हायची पोरांची आबाळ व्हायला! हो, तुम्हांला काय? घरांत खुशाल तुम्हीं आपला जीव खेळवायचे आणि पोरांचे हाल व्हायचे!

**नारद**:—पोरांचे हात चुकविण्यासाठींच ना, घरचं कामकाज करायला मी तयार झालों? जशी काय तुझीच मुलं! मला कांहीं दयामाया नाही वाटतं त्यांच्याबद्दल?

**वैज**:—तोंडाच्या फुकट पाटीलकीचा काय उपयोग! दिसेलच आतां काय प्रकाश पाडतां ते? मी जाते बाहेर. पाळण्यांत बाळ आहे. उठला तर—

**नारद**:—मी सांभाळतों त्याला. पण तूं लवकर ये म्हणजे झालं. (वैजयंती जाते) काय माझा हा संसार?

[ रागेश्री—त्रिताल ]

**भाल—लेख विधिचा टळेना॥ भोगिल्याविण सुरा सुरांना सान थोर भावा वरीना॥ धृ०॥ जगिं सखा सुखाचा गमला॥ विपदिंना सोबती कुणाला॥ हिणविति छेडुनी जिवाला॥ १॥** [पडदा]

[ अंक दुसरा समाप्त. ]

# अंक तिसरा.

## प्रवेश १ ला.

**स्थळः**—नारदाचें घर. **पात्रें**:—( नारद, वैजयंती, आणि कृष्ण )

( नारद पाळणा हालवीत आहे असा पडदा उघडतां. )

**नारदः**—

( पाळणा )

**मायामय भव-भावा ॥ भासला सुखाचा ठेवा ॥ देवा ॥ धृ० ॥**
**करीं ये दोरी ॥ मिळवि शिदोरी ॥ गृहिणी संसारा ॥ १ ॥**
**न सुखा आशा ॥ येई निराशा ॥ भुललों मायेला ॥ २ ॥**
**असुखें भरला ॥ जिव हा विटला ॥ पदिं देई ठावा ॥ ३ ॥**

विटलों या संसाराला ! कुठून संसार-थाटण्याची दुर्बुद्धि झाली मला ! पोरांनीं तर भंडावून सोडलें ! स्वताच्या पायावर, संसार थाटण्याची ज्याची ऐपत नाहीं त्यानें तरी संसाराची आपत्ती अंगावर ओढवून घेऊं नये ! काबाडकष्ट करण्याची संवय नाहीं, पैसे मिळविण्याची अंगीं अक्कल नाहीं, म्हणून माझ्याहातीं आली पाळण्याची दोरी आणि वैजयंती लागली मिळवायला शिदोरी ! "जिच्या हातीं पाळण्याची दोरी, ती जगातें उद्धारी" या म्हणीऐवजीं "ज्याच्या हातीं पाळण्याची दोरी, तोचि खरा संसारी" हीच म्हण यापुढें जगांत प्रचलित होणार ! ( मूल रडूं लागतं ) लागलं मूल रडण्याचं ध्रुपद आळवायला ! जसं कांहीं मुळावरच जन्मलं आहे माझी पाठ पुरवायला ! काय करावं आतां ? कुठला अंतरा आळवून, या ध्रुवपदाला आळा घालूं ? ध्रुवपद मिळवायलादेखील ध्रुवानें एवढा कंठशोष केला नसेल ! घाण्याला बांधलेल्या बैलाप्रमाणं सकाळपासून मला या पाळण्याला बांधलं आहे ! क्षणाचीदेखील विश्रांती हाताला नाहीं ! ( पुन्हां मूल रडूं लागतं ) हे ! झालीच पुन्हां ध्रुपदाला सुरवात ! अजून कशी वैजयंती येत नाहीं ? एकाला सांभाळतां सांभाळतां माझा जीव नकोसा झाला आहे ! इतर पोरांची परवड जर माझ्या मागं लागली, तर मात्र मी जिवंत रहात नाहीं नशीब !

कीं अजून त्यानीं आपला मोर्चा माझ्याकडं फिरविला नाहीं ! ( पाळणा म्हणतां म्हणतां झोपी जातो, इतक्यांत वैजयंती येंत, त्याला झोपलेला पाहून, हातानें हालवते. )

**वैजयंती**:—ऐकलं कां काय म्हणतें मी ? ( नारद कांहींच बोलत नाही असं पाहून ) कसली मेली ही झोंप इतक्या तिनसांजला ? अहो, मनाची नाही पण जनाची तरी आहे की नाहीं लाज ? ( मूल रडूं लागतं ) मूल रडतं आहे, ऐकूं येतंय कां तुम्हांला ? रडून रडून थकल्यामुळं, आवाजदेखील नाहीं रडायला ! मुलांना खेळवायचं राहिलं बाजूला, पण तुम्हीं मात्र हातपाय लांब करून, लागलांत आपला जीव खेळवायला !

**नारद**:—जशीं कांहीं तुझी पोरं शहाणीच पडलीं कीं नाहीं, बापाला सुखानें जीव खेळवूं द्यायला !

**वैज**:—माझीं आणि तुमची नाहीत वाटतं ती ? जशीं काहीं मी बाजारातून विकत आणलेलीं आहेत ! अजून सुद्धा तुम्हांला पोरांना खेळवायला येत नाहीं, तर मी कामाकाजाला बाहेर कशी जाऊं आणि खायाला काय घालूं माझीं हाडं ?

**नारद**:—माणसंच जर माणसांची हाडं खायला लागलीं, तर जगांत एकही माणूस दृष्टीला पडणार नाहीं ! बाकी ही तुझीं पोरं बापाचीं हाडं खायला मागं पुढं पाहणार नाहींत ! बरं पण तें जाऊं दे ! प्रथम मला सांग, इतका वेळ कशाला लागला तुला घरीं यायला ? पाळणा हालवितां हालवितां मी देखील झोंपेनें पेंगायला आलों, पण तुझ्या या पाळण्यांतल्या रडतरावाला मात्र चुकून देखील घटकाभर कांहीं झोंप आली नाहीं !

**वैज**:—पण तुम्हीं मात्र पोराहून पोर झालांत झोंपी जायला !

**नारद**:—घाण्याला बांधलेल्या बैलांना देखील दिवसांतून थोडा वेळ विश्रांति मिळते ! पण पाळण्याला झोंके देतांना, माझ्या हातातोंडाला एक क्षणाची देखील विश्रांति मिळाली नाहीं ! तुला यायला उशीर झाला, त्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्याऐवजीं, मलाच झोंपी गेल्याबद्दल दूषण देतेस ? असं नवऱ्याच्या तोंडाला तोंड देणं बायकोला शोभत नाहीं !

**वैजः**—तर, तर! बायकोनं कमावून, नवऱ्याला गिळायला घालायचं, हें तरी नवऱ्याला शोभतं कां?

**नारदः**—वाः वाः! मी नाहीं वाटत काम करीत? तुला कामाकाजाला जायला मिळावं म्हणून तर मी पोरं सांभाळायचं काम पत्करलं!

**वैजः**—उपकारच केलेत कीं नाहीं माझ्यावर? पण तेवढं काम देखील तुमच्या हातून पुरं होत नाहीं, उलट पोरांना सांभाळतो म्हणून बोलायला तयारी वैतागलें मी जीवाला! बाहेरून कावाडकष्ट करून घरीं आल्यावर, घरांत पोरांच्या रडण्याची रडकथा सुरू झालेली पहिली कीं जीव देऊन जन्माची मोकळीक करून घ्यावीशी वाटूं लागते.

**नारदः**—म्हणजे? माझ्या गाठीला जन्माचं पोरांचं लटांबर बांधणार कीं काय!

**वैजः**—मग त्यांत काय बिघडलं? पोरांना सांभाळतां येत नव्हतं, तर लग्न कशाला केलंत?

**नारदः**—तीच घोडचूक माझ्याकडून झाली.

**वैजः**—याची जाणीव मी तुम्हांला लग्नापूर्वीच दिली होती.

**नारदः**—पण एवढी पोरांची पैदास होईल, याची जाणीव त्यावेळीं कुठं होती मला? संसाराचा परिवार एवढा वाढतो, हें जर मला लग्नापूर्वीच समजलं असतं तर मी लग्नाच्या फंदांत पडलोंच नसतों.

**वैजः**—प्रेमाच्या पहिल्या दृष्टींत सुखाचं साम्राज्य दिसतं. पण पोरांचं पेव फुटल्यावर प्रेमाचा कंटाळा येऊन, संसार नकोसा वाटतो. हा सन्यास सन्याशानं संसारांत पडण्यापूर्वी घ्यावा लागतो. नाहीं तर सन्याशाच्या संसाराची विटंबना होते.

**नारदः**—होय. तशीच स्थिती माझी झाली आहे.

**वैजः**—मग आतां उगीच कशाला मनःसंताप करून घेतां?

**नारदः**—माझ्या मागचा पोरांचा ससेमिरा चुकावा म्हणून.

**वैजः**— तो आतां चुकवून चुकवितां येईल कां? बायकांना घरांत पोरां-बाळांसाठीं किती खपावं लागतं, याची जाणीव पुरुषांना नसते.

**नारद**:—मला त्याची आतां पुरी जाणीव झाली. भल्या माणसानें या संसारांत पडूं नये.

**वैज**:—संसारी झाल्यावर असाच युक्तिवाद प्रत्येकाच्या तोंडून निघतो. आतां पश्चात्ताप करून काय उपयोग ? इतक्यांत पोरं येतील बाहेरून जेवायला चला आंत आणि लागा जेवणाच्या तयारीला. मी सांभाळतें बाळाला. "आ" करून काय माझ्याकडे पाहतां ? इतकंदेखील तुमच्यानं होत नाहीं ? मला आता उभं देखील रहावत नाहीं. तुम्हांला आहे कां त्याचं कांहीं ?

**नारद**:—नको हा संसार ! देवा, सोडीव मला या संसाराच्या जंजाळातून बायकांची पाळी या नारदावर आली, आणि संसाराची खरीखुरी कल्पना आली. संसार ! संसार ! ! संसार ! ! !

**वैज**:—देवाला कशाला संकटात पाडतां ? तो येऊन कां तुमचा संसार चालविणार आहे ? सुखाच्यावेळीं त्याचं नांव तरी निघालं होतं कां मुखांतून ? मग त्यानें तरी यावेळीं तुम्हाला कां पोचावं ?

**नारद**:—वैजयंती, तूंच मला यावेळीं देवाच्या ठिकाणी दिसत आहेस. तुझ्याचपायीं या नारदाचा उद्धार आहे. तूं माझी अर्धांगी नसून, संसार पाशांतून मुक्त करणारी माता आहेस ?

**वैज**:—आतां मात्र तुम्हीं माणसांतून उठलांत. नाहींतर माता म्हणून संबोधलं नसतं. कुणी ऐकलं तर मला जगांत तोंड दाखवायला नको.

**नारद**:—तुझ्या तोंडाशीं जगाचा काय संबंध ? जगाच्या तोंडाला हात देतां येईल कां ? जग हें दुतोंडी आहे. भीक मागितली तरी हसतं, नाहीं मागितली तरी हसतं, पण उपाशी म्हणून पोटा पाण्याची व्यवस्था करतं कां ? शिवाय आतांचं माझं वर्तन शास्त्रबाह्य नाहीं.

**वैज**:—कुठल्या स्वार्थ सिंधूचा शास्त्राधार घेतलांत ?

**नारद**:—हा नारद केव्हांही शास्त्र वचनाविरुद्ध वागणार नाहीं. संसार स्वार्थाचा असेल, पण माझी कृती निःस्वार्थी आहे, हें तुझ्या तोंडूनच कबूल करून घेतों, म्हणजे तुला जगाला तोंड देतां येईल.

**वैज**:—ऐकूं द्या तर खरं तुमचं शास्त्रवचन ?

**नारदः**—वैजयंती, "ओळीनें नऊ सत्पुत्रांना जन्म देणारी सुपत्नी पतीला मातेसमान असतें." असा शास्त्रधार आहे. तुला तर त्याच्या कितीतरी पटींनें मान मिळाला आहे, तेव्हां तर दुतोंडी जगाला तोंडच रहाणार नाहीं तुला तोंड द्यायला. म्हणून म्हणतों की या लेंकराचा साष्टांग नमस्कार घे आणि सोडीव मला या संसार पाशातून! (तिला साष्टांग नमस्कार घालतो, ती गुप्त होऊन कृष्ण प्रगट होतो.)

**कृष्णः**—ऊठ! नारदा ऊठ, संसार पाशांतून मी तुला मुक्त केलं आहे!

**नारदः**—कोण? श्रीकृष्ण? मग वैजयंती कुठं गेली? कां श्रीकृष्ण आणि वैजयंती एकच?

**कृष्णः**—होय! नारदा, कृष्ण आणि वैजयंती एकच आहे!

**नारदः**—मग श्रीकृष्णा, तूं माझ्यासाठी स्त्रीरूप घेतलंस? मला तें कसं उमजलं नाही?

**कृष्णः**—तूं संसारी होतास म्हणून? संसारी सृष्टी नाहींशी झाल्याबरोबर माणसाला दिव्य दृष्टी प्राप्त होते! नारदा, तुझी दृष्टी मायेनें मोहांध झाल्यामुळं, माझं खरं स्वरूप पारखण्याच्या दिव्यदृष्टीला आतांपर्यंत तूं पारखा झाला होतास! भस्मासुराला भस्मिभूत करण्यासाठी, श्री विष्णूला देखील मोहिनी रूप घ्यावं लागलं! मग तुझ्यासारख्या ब्रह्मदेवाच्या मानसपुत्राचं मानस पुरं करण्यासाठीं, मला वैजयंतीची माया उत्पन्न करावी लागली यांत नवल कसलं? नारदा, तुझी संसार थाटण्याची इच्छा पुरी झाली कां?

**नारदः**—होय! श्रीकृष्णा, संसाराची पुरी हौस भागली! संसार असार आहे-सुखाचा भास आहे-मायेचा बाजार आहे, हें सत्य मला पटलं!

**कृष्णः**—माझ्या संसार-सुखाचा हेवा तुला वाटत होता नाहीं कां? तुला एका बायकोचा सांभाळ करता आला नाहीं, मग मला माझ्या सोळा सहस्त्र अष्टनायिकांचीं मनं सांभाळतांना किती श्रम पडत असतील, याची तुला कल्पना आलीच असेल!

**नारदः**—कृष्णा, शितावरून भाताची परीक्षा होतेच! तुझ्या मायावी वैजयंतीच्या सहवासांत कां होईना, पण मला संसाराचा पुरा अनुभव आला!

**कृष्ण**:--तुझा संसार मायेचा होता म्हणूनच तूं सुटलास ! खरोखर तूं संसारी झाला असतास, तर तुला कांही संसारमुक्त होतां आलं नसतं ! पण झालाच एकदांचा मुक्त ! त्यांतच मला आनंद झाला !

**नारद**:--माझी फजिती करण्यांत, तुला आनंद कां झाला कृष्णा ?

**कृष्ण**:--नाहीं ! नारदा, असं मनाला वाईट वाटून घेऊं नकोस ! तुझी योग्यता माझ्याहून मोठी आहे ! जें परब्रम्हस्वरूप पाहण्यासाठीं, साधुसंत वर्षानुवर्षे तपश्चर्या करतात, त्या स्वरूपाचं दर्शन, तिन्ही त्रिकाल लाभत असलेल्या नारदाला संसार रहस्य दाखवायाला मात्र मी कारणीभूत झालों ! नारदा, परब्रम्हस्वरूपाच्या मागें लागलेल्या, तुझ्या शिष्याची-पेंद्याची काय स्थिती झाली आहे पाहून ये.

(नारद जातो.)

[ बिहाग-झपताल ]

**झाला उदासीन ॥ विटला भवाला ॥ नच मान अपमान ॥ धृ० ॥ मन विरत विषयांत ॥ स्मृति तेंवि हृदयांत ॥ असुखांच ती उदित ॥ १ ॥**

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**:—सत्यभामेचा महाल. **पात्रें**:—[भामा-मंथरा आणि कृष्ण.]

**सत्यभामा**:—काय म्हणतेस, पेंद्यानें संन्यास घेतला ?

**मंथरा**:--होय ! मला वाटत होतं कीं ते फिरून येतील म्हणून !

**सत्य**:—तूं त्याला संन्यास घ्यायला कां दिलास !

**मंथरा**:--मला वाटलं सोंग म्हणून ! रागावले म्हणजे नेहमीं संन्यासाची भीति घालीत होते ! आज सहा महिने झाले या गोष्टीला ! सारखी वाटेकडे डोळा लावून बसले आहे ! चुकूनदेखील एक दिवस घरीं आले नाहींत !

**सत्य**:—मंथरे, बायकांचा वेडा जीव पुरुषासाठीं तळमळतो !

**मंथरा**:—आणि त्याना मात्र बायकोबद्दल हळहळ वाटत नसते ! पुरुषच ते ! त्यांना कुठून दया असणार ? उलट बायको म्हणून तिच्यावर सत्ता गाजवायला तयार !

**सत्य**:—पण त्याला सन्यास घ्यायला कारण काय झालें ?

**मंथरा**:—पुरुषांना डोक्यांत राख घालायला कारण लागत नसतं ! थोडीशी संसाराची जळ पोचली कीं तेवढंच कारण पुरं होतं संसाराची राख करायला ! त्यांची बायको झालें हाच माझा गुन्हा ! घरांत पाय ठरेल तर शपथ ! ऊठ पाय घराबाहेर ! जेवणापुरतं घरांत !

**सत्य**:—हा तर पुरुषांचा जन्मसिद्ध हक्क आहे !

**मंथरा**:—पण हा जन्मसिद्ध हक्क गाजवतांना, घरांत गजांत लक्ष्मी असायला नको का ? तिच्या बहिणीचा वास मात्र निरंतर घरांत ! अशा परिस्थितींत पोराचे हाल व्हायला लागले, मग पाझ्यानें स्वस्थ बसवेल कां ? स्वावलंबनी होण्यासाठीं, मी त्यांना बोलत असे ! लोकांना माझा तोंडाळपणा दिसे पण त्यांची कृती मात्र कुणाला दिसत नसे !

**सत्य**:—मंथरे, सगळे पुरुष एकाच माळेचे मणी ! जसे कांहीं साच्यातील ओतीव पुतळे ! कुणाचं दिसतं नि कुणाचं दिसत नाहीं ! एवढाच काय तो फरक !

**मंथरा**:—पुरुषांना दाहीदिशा मोकळ्या ! त्यांना विचारणार कोण ? आत मी काय करूं ? सत्यभामाबाई, कुणाचे पाय धरूं त्यांना घरीं परत आणायला ?

**सत्य**:—पण तो कुठं आहे, तें ठिकाण तरी तुला ठाऊक आहे कां ?

**मंथरा**:—तें ठिकाण जर मला माहीत असतें, तर मी कशाला आलें असतें आपल्याकडे ? मीच हात धरून त्यांना घरीं आणलें असतें.

**सत्य**:—खरंच, मंथरे, बायकांनीं एवढं मनोधैर्य दाखविलं तरच, पुरुषाचे पाय घराबाहेर पडणार नाहींत ! नाहीं तर अबला म्हणून त्यांच्यावर वाटेल तशी पुरुषी सत्ता चालवायला मागंपुढं पाहणार नाहींत ! हें पुरुषाचं बंड मोडल्याशिवाय स्त्रियांना स्वातंत्र्य-सुख लाभणार नाहीं !

[ सोहनी—त्रिताल ]

**स्वतंत्रता न लाभतां समानता ॥ नच साध्यचि वनितांना ॥ सविनया भजति जाया कांता ॥ धृ० ॥ सुधा कदां ना वदती बोला ॥ सेव्य-सेविका मानिति अबला ॥ न्याय हाचि वरुमियां अद्यता ॥ १ ॥**

**कृष्ण:**—( प्रवेश करून ) भामा, पुरुषाविरुद्ध बंड उभारून, कुठलं राज्य मिळविण्याचा कट चालला आहे !

**सत्य:**—एकूण आपण चोरून भाषण ऐकत होता वाटतं आणि ऐकलं म्हणून काय झालं ? बायकांनीं बंड उभारून, पुरुषांचं बंड मोडल्याखेरीज, त्यांना स्वराज्य मिळणार नाहीं !

**कृष्ण:**—बायकांनीं पुरुषाविरुद्ध बंड उभारूं नये म्हणून त्यांनीं स्वखुषीनेंच स्वराज्य दिलं आहे ! स्वराज्य मिळून देखील, पुरुषाच्या विरुद्ध बंडाचें निशाण उभारल्यानें, बायका कायद्यानें गुन्हेगार ठरतात, हें त्यांनीं विसरता कामा नये !

**सत्य:**—असलं पारतंत्रिक स्वराज्य बायकांना नको आहे ! स्वराज्याच्या नांवाखालीं बायकांच्या पायांत गुलामगिरीच्या गृहशृंखला अडकवून स्वराज्याचं सूत्र, स्वताच्या हातीं ठेवण्यांत, पुरुषांचा स्वार्थीपणा दिसून येत नाहीं कां ?

**कृष्ण:**—घराचीं सारी सूत्रं, बायकांच्या हवालीं करून देखील पुरुषा-विरुद्ध चळवळ करणं कायद्याविरुद्ध आहे !

**सत्य:**—बायकांनीं कायदेभंग केल्याखेरीज, पुरुषांच्या एकतंत्री स्वराज्यांत त्यांना समसमान हक्क मिळणार नाहींत !

**कृष्ण:**—त्यांच्या हातीं स्वराज्याची सारी सूत्रं दिलीं, तर पुरुषांच्या नाकांत वेसण घालून, स्वताच्या मर्जीनुरूप, त्यांना नाचवायला कमी करणार नाहींत !

**सत्य:**—कशाला उगीच स्त्रियांना नांवं ठेवतां ? पुरुषांच्या सत्ताधारी सत्तेला मान वांकविल्यामुळं, स्त्रियांचे कसे हाल होतात, याचा जिवंत मासला ही मंथरा आहे ! तिची पुरुषाविरुद्ध फिर्याद आहे, त्याची दाद आपण घ्याल कां ?

**कृष्णः**—कोण मंथरा ? पेंद्याची बायको ? तिची काय फिर्याद आहे, तें आधीं मला कळूं द्या ! मग मी देईन त्याचा निकाल !

**सत्यः**—पण निःपक्षपातानें निकाल दिला पाहिजे हें विसरूं नका ! नाहीं तर तुम्हीं पुरुष पुरुषांच्या बाजूनेंच निकाल द्यायचे !

**कृष्णः**—नाहीं ! भामा, मी तरी पक्षपात दाखविणार नाहीं ! निष्ठूर न्यायाधिशाप्रमाणें, न्यायानें निर्णय देईन मग तर झालं ! मंथरे, बोल, तुझी काय फिर्याद आहे ती ?

**मंथराः**—माझी फिर्याद नाहीं पण विनंती आहे !

**कृष्णः**—म्हणजे ? विनंतीरूपी फिर्याद असंच ना ? बोल, कुणाविरुद्ध तुझी फिर्याद आहे ?

**मंथराः**—त्यांच्याविरुद्ध !

**कृष्णः**—त्यांच्याविरुद्ध म्हणजे ? त्यांचं नांव काय ? हंसूं नका ! न्यायासनाची बेअदबी होते !

**सत्यः**—हें काय बरं असं ? त्यांचा जीव चालला आहे आणि तुमचा खेळ चालला आहे !

**कृष्णः**—हं ! भामा, न्यायमंदिराचा अपमान होतो आहे ! न्यायाधिशाला न्यायासनाची जबाबदारी ओळखूनच, न्यायनिवाडा द्यावा लागतो. न्यायासनावर बसल्यावर, त्याला नातंगोतं नसतं—पुराव्यावरून फिर्यादीचा विचार करावा लागतो ! अर्जदाराला, फिर्याद व्यवस्थित रितीनें रुजु करतां येत नाही, तर त्यानें न्याय-पंडित नेमावा म्हणजे न्यायमंदिराचा वेळ वाया जात नाहीं ! मग तुम्हींच मांडा त्याच्या वतीनें फिर्याद !

**सत्यः**—मी घाबरेन कीं काय फिर्याद मांडायला ! अर्जदारणीचा नवरा म्हणजे मंथरेचा नवरा पेंद्या, सन्यास घेऊन नापत्ता झाल्याला सहा महिने झाले, तरी न्यायमंदिरानं, त्याचा तपास लावून, वादीला प्रतिवादी मिळवून द्यावा एवढीच वादीची फिर्याद आहे !

**कृष्णः**—प्रतिवादीनें सन्यास कां घेतला ? वादीचें आणि प्रतिवादीचें कधीं भांडण झालं होतं कां ?

**सत्य**:—वादीची आणि प्रतिवादीची रोज तोंडातोंडी हांत असे !

**कृष्ण**:—त्याला कारण ?

**सत्य**:—पुरुषी सत्ता !

**कृष्ण**:—असंच कांहीं म्हणतां येणार नाहीं ! संसार सुरळीतपणें चालायला नवरा बायकोची एकी असावी लागते ! एकानें चूक केली म्हणून दुसऱ्यानें एकेरीवर येऊं नये ! हें संसाराचें आद्यसूत्र, स्त्री पुरुषांना माहीत नसल्यामुळेंच, नवरा बायको वर्दळीवर येऊन, वादी प्रतिवादीसारखीं भांडणं विकोपाला जातात आणि शेवट संसार विस्कळीत होतो !

**सत्य**:—ही तत्वं फक्त स्त्रियांवरच लादलीं जातात ! पुरुषवर्ग त्याचा विचार करीत नसतो ! त्यांच्या विसंगत वर्तनाबद्दल, स्त्रियांनीं त्यांची करून उघाडणी केली तर त्यांना अपमान वाटतो स्वातंत्र्याला बाध येतो ! मग वर्दळीवर येऊन घराबाहेर पडतात आणि स्त्रियाच्या नांवानें भलतीच हांकाटी करतात ! यापुढं पुरुषाकडून स्त्रियांना योग्य मान मिळावा, सत्तेच्या जुलूमाला पायबंध पडावा म्हणून वादीनें या न्याय मंदिराकडे धांव घेतली आहे ! प्रतिवादीला वादीसमोर हजर करावा, हाच फिर्यादीचा पहिला मुद्दा आहे !

**कृष्ण**:—वादीच्या इच्छेप्रमाणें, प्रतिवादीला हजर केल्यानंतर, वादी त्याच्याशीं गुण्यागोविंदानें वागायला तयार आहे कां ?

**सत्य**:—झाल्या गोष्टीबद्दल वादीला पश्चात्ताप होतो आहे आणि यापुढें प्रतिवादीशीं गुण्यागोविंदानें वागायला तयार आहे !

**कृष्ण**:—ठीक आहे ! ही गोष्ट न्यायमंदिरानें नोंद करून घेतली आहे ! थोडक्या दिवसांत प्रतिवादीला वादीच्या स्वाधीन केला जाईल ! आपापसांत तंटा मिटवून घेतल्याबद्दल न्यायाधिशाला आनंद होत आहे ! न्यायमंदिराचं काम संपलं ! ( सत्यभामेजवळ येऊन ) कां भामा, न्यायाधीशाकडून योग्य न्याय निर्णय मिळाला ना ?

**सत्य**:—थट्टा राहूं दे ! खरंच कां आपल्याला पेंद्याचा पत्ता माहीत आहे ?

**कृष्ण**:—भामा, नारदाला जसा संसाराचा कंटाळा येऊन, तो पूर्वपदाला आला, त्याचप्रमाणें पेंद्याची स्थिती होणार !

**सत्य**:—म्हणजे ?




**कृष्णः**—भामा, तुटेपर्यंत ताणणं बरं नव्हे.

**कृष्ण**:--म्हणजे काय? वैजयंतीनें नारदाला संसार-रहस्य समजावून दिल्यामुळें त्यानें तिला माता म्हणून नमस्कार केला आणि संसार-पाशांतून मुक्त झाला.

**सत्य**:--उगीच बिचाऱ्याला आपण सतावलं झालं!

**कृष्ण**:—मी सतावलं? छान! भामे, तुझा मात्र न्यायनिवाडा जगावेगळा आहे! नारदानें माझा पिच्छा पुरविल्यामुळंच, मला वैजयंतीची माया उत्पन्न करावी लागली! मायावी पाशांत तो एवढा गुरफटून गेला कीं नको हा संसार असं त्याला झालं आणि त्याचे डोळे उघडले! भामे, नारदानें इतकीं वर्षें संसार केला तरी अजून तो बाल-ब्रम्हचारीच आहे!

**सत्य**:—आपल्यासारखाच कीं नाहीं?

( पहाडी—गज्जल )

**कुंजवनाला खेळ खेळलां॥ मोहुनीयां गोपिबालां॥ नाद सौख्याचा लागला॥ धृ०॥ जगांत बाल-ब्रह्मचारि नाम मिळवाया॥ कृती न आचरितां कोणि मानिना बोला॥ १॥**

**कृष्ण**:—त्यांत काय तुला नवल वाटलं?

**मंथरा**:—नवल नाहीं तर काय? संसारी आणि बाल-ब्रम्हचारी? मग द्वारकेंतील सगळेच संसारी बाल-ब्रम्हचारी होतील!

**कृष्ण**:—ती पारखण्याची दृष्टी तुम्हांला कुठें आहे! नारदाची योग्यता, इतर माणसाहून वेगळी आहे, हें तुम्हांला सांगून कसं पटणार? नारदाला मी पेंद्यांच्या समाचाराला पाठविला आहे.

**मंथरा**:—म्हणजे तुम्हांला तें ठिकाण माहीत आहे तर? चला, मला घेऊन चला!

**कृष्ण**:--मंथरे, एवढी अधीर होऊं नकोस! मी पुढें जातों, तूं भामेबरोबर ये! (सत्यभामेच्या कानांत सांगतो) या ठिकाणीं तुम्हीं दोघीही या म्हणजे तुम्हांला दोघांचं परब्रम्हरूप पहायला मिळेल! (पडदा)

## प्रवेश ३ रा.

**स्थळः**—अरण्य.

**पेंद्याः**—घराचा मोह सोडून समाधीशी एकजीव होता यावं म्हणून या घोर अरण्यांत आलों! पण या निर्जन अरण्यांत पाऊल ठेवल्यापासून पावलागणीक हिंस्त्र पशुश्वापदांची भीती भासूं लागली! त्यामुळें समाधी तर राहोच, पण इथें उभं राहण्याचं मनोधैर्य देखील नाहींसं झालं! देहाची आशा सोडल्याशिवाय, भीतीचा बावरेपणा नाहींसा होणार नाहीं! संकटाचे पर्वत ओलांडल्याशिवाय, परब्रम्हरूपाची प्राप्ती होत नाहीं, असं नारदांनीं मला सांगितलं, तेंच अनुभवाला आलं! एकदां डोळे मिटून, समाधी लावली कीं देहाची स्मृती राहणार नाहीं! तेव्हां बसावं समाधी लावून आतां! (नमो भगवते वासुदेवाय असं म्हणत समाधी लावून बसतो) असं काय व्हायला लागलं! डोळे मिटले तरी दृष्टीसमोर घरदार, गुरंढोरं दिसूं लागलीं! संसाराची व्यवस्थित रितीनें निरवानिरव करून आलों तरी संसाराचें चित्र कांहीं दृष्टीआड होत नाहीं! आजचा शेवटचा दिवस! प्रयत्नांची पराकाष्ठा करून ध्येय गांठलं पाहिजे! नाहीं तर मंथरेला कांहीं तोंड दाखवितां येणार नाहीं! आधींच तिचा माझ्या संन्यासवृत्तीवर विश्वास नव्हता आणि आतां जर फिरून घरीं गेलों, तर जन्मभर पाठीमागचा संसार कांहीं सुटणार नाहीं! आतां हटयोगच केला पाहिजे! म्हणजे ही संसारी सृष्टी दिसेनाशी होईल! (समाधी लावून बसतो, इतक्यांत नारद येतो).

**नारदः**—वैजयंतीच्या मायावी संसारानें कां होईना, या नारदाला खरं संसार-रहस्य कळून आलं! संसारांत सुख आहे असं मानणाऱ्यांनीं या नारदाचा चंद्रमौळी संसार पाहिला असता, तर त्यांनीं संसाराचं नांव देखील घेतलं नसतं! श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून पेंद्याची स्थिती पहायला मी आलों, पण त्याचा अद्याप कांहीं पत्ता लागला नाहीं! कां तो देखील माझ्याप्रमाणेंच परब्रम्हस्वरुपाला कंटाळून, संसाराच्या मागें लागला! त्याच्या बायकोची—मंथरेची मूर्ति डोळ्यासमोर उभी राहिली, तर अजूनही माझ्या अंगावर कांटा उभा राहतो! म्हणूनच बिचारा संसाराला कंटाळला! (पेंद्याला पाहून) अरे, वा:! पेंद्या तर समाधी लावून बसला आहे! पण अंतःकरणांतील विचाराच्या वादळांत, मायावी

मन हेलकांवे घेत आहे, असं चेहेऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे ! यावरून याची संसाराची माया सुटली नाही आणि देहाची आशा तुटली नाहीं, मग याला परब्रम्ह-स्वरूपाचं दर्शन कुठून होणार ? मी देखील संसाराच्या मायेमागं लागून, परब्रम्ह-स्वरूपाला अंतरलों ! मग हा तर संसारांतला किडा, याला मोह सुटला नाहीं तर नवल कसलं ? माझ्या हातून झालेल्या पापाचं क्षालन, देहदंडणानेंच केलं पाहिजे !

[ देसकार—झपताल ]

**नारायणा नाम, करि पाप शमना, विसरोनि तें धाम, भुललों भवाला ॥ धृ० ॥ सभोंवार अंधार ॥ झालों निराधार ॥ नुरला अहंकार ॥ झणिं दे कराला ॥ १ ॥**

( नारद समाधी लावून बसतो.)

**पेंद्या:**—( वाघाचं गुरूगुरणं ऐकून घाबरतो ) अरे बापरे ! वाघ आला वाटतं ? पेंद्या, झाली तुझी इथेंच समाप्ती ! घर ना दार आणि वाघाच्या भक्ष्य-स्थानीं पडणार ! अरेरे ! आतां काय करूं ? कुणाचा धांवा करूं ? विना स्वार्थ मरणार ! मरतां, मरतां, कृष्णाचा तरी धांवा करावा ! त्याला कुठं ऐकूं येणार म्हणा ? पण तेवढ्यानें मनाचं तरी समाधान होईल ! “ कृष्णा धांवरे लौकरी ॥ संकट पडले भारी ॥ हरी तूं आमुचा कैवारी, तुजविण कोण निवारी ” ॥ कृष्णा कृष्णा—कृष्णा ?

**कृष्ण:**—( प्रवेश करून ) पेंद्या, घाबरूं नकोस ! आलोंच मी तुझ्या मदतीला !

**पेंद्या:**—कुणाचे शब्द हे ? कृष्णाचेच ! अखेर माझी अखेरची हांक कृष्णाला ऐकूं आली आणि धांवत आला मला सोडवायला ! वाघापुढं त्याचं तरी काय चालणार ? उगाच माझ्याबरोबर त्यालाही प्राणाला मुकावं लागणार ! कोण कृष्णा ? माझ्या हांकेला धांवून आलास—आनंद झाला मला ! तिथेंच उभा रहा—पुढें येऊं नकोस !

**कृष्ण:**—कां पुढें येऊं नको म्हणतोस ? कुणाची भीती वाटते तुला ?

**पेंद्या:**—अरे बाबा, मी वाघाच्या तोंडी सापडलों आहे ! तूं तरी कृपा करून पुढें येऊं नकोस ! उगाच कशाला जिवावर उदार होतोस ?

**कृष्ण:**—माझी मदत तुला नको होती, मग कशाला मला हांक मारलीस ?

**पेंद्या:**—कृष्णा, तूं माझा बालपणाचा संवगडी ! झुणका भाकर देखील, मी तुला दिल्याशिवाय खाल्ली नाहीं ! कुठलीही गोष्ट तुझ्यापासून मी लपवून ठेवली नाही ! मग एवढी गोष्ट तुला कळावी, म्हणूनच मी वाघाच्या तोंडी पडण्यापूर्वी तुला हांक मारली ! तूं माझ्या हाकेला धावून आलास, कृतार्थ झालों ! मला एकट्यालाच मरूं दे ! तूं पुढें येऊं नकोस ! एवढं माझं तुझ्याजवळ शेवटचं मागणं आहे !

**कृष्ण:**—स्नेहाला जागलों नाहीं तर तुझा संवगडी कसला ? बाळपणापासून माझ्या प्रत्येक कृत्याचा अर्धा वाटेकरी तूं होतास, मग मी मात्र जिवाच्या आशेनं, तुझ्या संकटाचा वाटेकरी होऊं नये, हें मला शोभेल कां ? हा पहा मी आलोंच, वाघाशीं दोन हात करायला ! ( पुढें होऊन ) पेंद्या, कुठें आहे वाघ ? दाखव मला म्हणजे मी त्याचा चांगलाच समाचार घेतों !

**पेंद्या:**—कृष्णा, वाघ म्हणजे मेंढरू नव्हे दोन हात करायला ! तो पहा वाघ ! तुझ्या माझ्याकडं कसा टवकारून पहातो आहे ! केव्हां झडप घालील याचा नेम नाहीं ! मी तर मरणार खास ! तोंपर्यंत तूं तरी सुखरूप जा !

**कृष्ण:**—कुठं आहे तो वाघ ! दाखव मला ! मला तर दिसत नाहीं ! ( पाहिल्यासं करून ) तो कां ! पेंद्या, तुझी दृष्टी आंधळी तर झाली नाहीं ना ! घाबरू नकोस ! माझा हात धर आणि तिकडे निरखून पहा !

**पेंद्या.**—[ पाहून ] अरेच्या ! वाघ कुठं गेला ? हा काय चमत्कार ? कृष्णा, त्या जागीं आकृती दिसूं लागली ! शंखचक्र पद्मगदाधारी शेषशाई नारायणाचं रूप दिसूं लागलं ! किती मी भाग्यवान ! चल कृष्णा, लवकर चल, दर्शन तरी घेऊं या !

**कृष्ण:**—तें तुझ्या नशिबीं नाहीं ! पहा फिरून तिकडे ! आहे कां तिथं कांहीं !

**पेंद्या:**—नाहीं ! कृष्णा, हा काय चमत्कार ?

**कृष्णः**—त्यालाच परब्रम्हस्वरूप म्हणतात! तें दर्शन घडण्याचं तुझ्या नशिबीं नव्हतं म्हणूनच तुला वाघाची भीती वाटली! तेंच परब्रम्हस्वरूप वाघाच्या रूपांत आलं होतं! तें तुला ओळखतां आलं नाहीं! हा तुझा दोष नसून मायेचा आहे! भक्ताची कसोटी पाहिल्याखेरीज परमेश्वर परब्रम्हस्वरूपाचं दर्शन देत नसतो! संसार विरक्तीशिवाय समाधी लागत नसते! याची प्रचिती तुला पहायची असेल, तर या नारदाच्या समाधीकडे पहा! तुझ्या त्या वाघाच्या गर्जनेनें याच्या समाधीचा भंग झाला कां? आत्म्याशीं एकजीव झाल्यावर देह निर्जीव होतो! मग बाह्य जगाची कुठली आठवण? असल्या योग समाधीनेंच परब्रम्हस्वरूपाचं दर्शन होतं! (इतक्यात सत्यभामा आणि मंथरा येतात)

**सत्यभामाः**—पेंद्या, संसाराला लाथ मारून, परब्रम्हस्वरूप पाहिलंस कां?

**पेंद्याः**—कोण सत्यभामा? तुम्हीं देखील आलात मंथरेला घेऊन, माझी फजिती पहायला!

**सत्यः**—पेंद्या? मी कांहीं स्वखुशीनें आले नाहीं इथं?

**पेंद्याः**—म्हणजे?

**सत्यः**—मंथरेनं मला इथं आणलं!

**पेंद्याः**—मी या जागीं आहे, हें मंथरेला कसं कळलं? मला वाटतं ही कृष्णाचीच कारवाई—

**कृष्णः**—पेंद्या, चुकतोस तूं! माझी कारवाई नाहीं! तुझ्या बायकोची आणि भामेची ही चतुराई! दोघींनीही मसलत करून पुरुषांविरुद्ध बायकांचं बंड उभारण्याचें निश्चय केला!

**पेंद्याः**—बायकांचं बंड! म्हणजे?

**कृष्णः**—पुरुषांविरुद्ध मोहीम आणि एकदां कां बंडाचा वणवा द्वारकेंत पसरला असता, तर तुला, मला आणि इतर पुरुषांना बायकांची कामं करण्याची पाळी आली असती! तें गंडांतर मी समेटानं टाळलं?

**पेंद्याः**—कसला समेट?

**कृष्ण**:—यापुढें तूं संन्यास घेणार नाहीं म्हणून ? नाहीं तरी तुझा संन्यास आज हास्यास्पदच झाला आहे !

**सत्य**:—पेंद्या, बायका मुलांना संसाराच्या संकटांत टाकून, पुरुषांना परब्रम्हस्वरूप गांठतां येत नसतं, हें तुझ्या अनुभवाला आलंच आहे. स्त्री म्हणजे पुरुषांची आदिशक्ती ! तिचा अव्हेर करून, अरण्यांत नाक धरून बसल्यानं, मनाच्या समाधानाच्या अभावीं, समाधीशीं एकजीव होत नसतो ! स्त्रियांच्या प्रसन्न मनानेंच, संसाराचा निरोप घ्यावा लागतो !

[ भैरवी—एका ]

**सहगामी पुरुषाला, सुख असुखा समभागी, कामिनि जगीं सुशीला ॥ धृ० ॥ जाया जणुं पति छाया ॥ भिन्न दिसे जरि काया ॥ संसारीं पतिविहीन, जीवन नसे तियेला ॥ १ ॥**

**पेंद्या**:—मला तर मंथरेनेंच संन्याशी बनवलं ! हा संन्याशाच्या वस्त्राचा अहेर देखील तिनेंच केला, म्हणजे प्रसन्न मनानेंच संसाराचा निरोप घेतल्यासारखा नाहीं का ?

**सत्य**:—पण एवढ्या वयांत डोक्यांत राख घालून, संसाराची राख कां केलीस ?

**पेंद्या**:—त्याला ही मंथराच कारण !

**मंथरा**:—त्याला कारण मी कां ? का आपलं संसारावरील दुर्लक्ष ?

**पेंद्या**:—त्यालाही कारण तूंच !

**मंथरा**:—ती कशी ?

**पेंद्या**:—तुझा तोंडाळपणाच कारणीभूत झाला, मला संसाराचा वीट यायला ! मग तुम्हींच सांगा, यांत माझी कां हिची चूक !

**मंथरा**:—सत्यभामाबाई, करायचं आपण आणि दोष बायकोच्या माथीं ही पुरुषाची रीतच आहे ! जिथं तिथं माझा तोंडाळपणा वाजवितात ! आंतड्याला

आग लागल्याखेरीज तोंड उघडत नसतं ! बायकांचं तोंड दिसतं पण पुरुषांची कृती दिसत नाहीं ! तुम्हींच न्याय निवाडा करा ! आम्हां गरीब गुराख्यांचा संसार म्हणजे गुरंढोरं ! त्यांचं संगोपन करून दही–दुधावरच ना आमचा जीवनक्रम चालायचा ! मग त्याकडे दुर्लक्ष केल्यानें, वेळेवर गिळायला मिळेल कां ?

**कृष्ण**:—मंथरे, आतां हा वितंडवाद कशाला ? यापुढें पेंद्या, स्वप्नांत देखील संन्याशाची आठवण करणार नाहीं ! चांगली अद्दल घडली आहे त्याला !

**मंथरा**:—हें संन्याशाचें वेड त्या कली नारदांनीं लावलं आणि आपण संसारी झाले !

**कृष्ण**:—मंथरे, तिकडे पहा, संसारी संन्याशी, समाधीशी कसा एकजीव झाला आहे तो ! नारदा—

**नारद**:—( समाधी उतरून ) कोण, श्रीकृष्ण ? सत्यभामा तूं आणि मंथराही इथंच !

**सत्य**:—नारदमुनी, हाच कां तुमचा संसार ?

**नारद**:—सत्यभामे, हाच संन्याशाचा संसार !

**सत्य**:—मग उगाच विवाह करून, वैजयंतीसारख्या संसार दक्ष पत्नीला संसारांतून उठवलंत !

**नारद**:—सत्यभामे, मीच स्वकर्तव्याला विसरून, संसाराच्या मागें लागलों आणि श्रीकृष्णानें वैजयंतीच्या मायेनं, माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन घातलं ! तूं ही कृष्णाची साथीदारीण होऊन, मला मात्र संसाराच्या माया जाळांत गोलांट्या घ्यायला लावलंस ! अशाच सर्व स्त्रिया पतीशीं सहकारित्वानें वागतील, तर संसाराचं नंदनवन बनवतील. पण माझ्यासारख्या संन्याशानें मात्र संसाराच्या मागें लागूं नये !

**पेंद्या**:—एकूण नारदमुनी, थोडक्यांत तुम्हांला संसाराचा कंटाळा आला तर ? हें भविष्य मी तुम्हांला पूर्वींच सांगितलं होतं ! पण तुम्हीं कुठं ऐकलंत माझं ? मारून मुटकून मला तुम्हींच गुरु बनविलांत !

**नारद**:—त्यामुळेंच मला " संसार-रहस्य " कळून आलं! एकूण काय, आपण दोघेंही तोंडघशी पडलों आणि कृष्णाला त्याचं फळ मिळालं!

**कृष्ण**:—पेंद्या, संसारपाश आणि देहाची आशा सुटल्याखेरीज रानावनांत जाऊन " ओम् नमो भगवते वासुदेवाय " मुखानें म्हणत डोळे मिटल्यानें परब्रम्हस्वरूप दिसत नसतं! तसंच आजन्म ब्रम्हचाऱ्यानें संसार-सुखाच्या मोहानें, संसार थाटण्याचा प्रयत्न केला, तर त्याची फजिती कशी होते, हें तुम्हां दोघांच्या चारित्र्यावरून लोकांना बोध होईल! पण काहीं कां होईना! शेवट गोड झाला! पेंद्याचं " परब्रम्हस्वरूप " आणि नारदाचा " संसार " जगाच्या अंतापर्यंत लोकांना मार्गदर्शक होऊन राहील. (पडदा)

**समाप्त.**